# स्वल्पविराम

लेखक

रघुनाथ कृष्ण फडके, शिल्पकार

प्रथमावृत्ति जून १९३७

किंमत १ रुपया

# समर्पण

अकृत्रिम प्रेम, जिव्हाळ्याचा स्नेहभाव व
गुणज्ञतादर्शक कृपालोभानें ज्यांनीं ज्यांनीं
मला उपकृत करून बहुमोल
आनंद दिला त्या सर्व
परमपूज्य आप्तेष्ट, सन्मित्र
व थोरामोठ्यांना
सादर समर्पण.



# तरुणसाहित्य-मालेचे पेट्रनस्

श्रीमंत महाराज सदाशिवराव खासेसाहेब पवार
देवास राज्य २

श्रीमंत रावबहादुर सेतुराम बाबा पवार, धार.

श्रीमंत आनंदराव जाधव राजे साहेब, देऊळगांव.

दिवाण बहादुर के. नाडकर, दिवाण आणि ॲडमिनिस्ट्रेटिव्ह
कौंसिलचे अध्यक्ष, सं. धार.

श्री. रा. रा. आर. जी. नाडकर,
बी. ए. एल्एल्. बी., धार.

श्री. प्रो. बा. ग. चव्हाण, एम. ए., धार.

श्री. शिल्पकार र. कृ. फडके.

श्री. चिंतामण बळवंत लेले, बी. ए., धार.

## हितचिंतक

श्रीमंत महाराज कुमारी अलकनंदाबाई जाधव,
देवास २

या पुस्तकाच्या प्रती खालील पत्त्यावर मिळतील:—

**" स्कूल अँड कॉलेज बुकस्टॉल "**

**कोल्हापूर.**

# संपादकीय



आज मालेचें ४ थें पुष्प सादर करण्यास मला अत्यानंद होत आहे. सहा महिन्यांच्या आंतच हा सुयोग यावा हें मालेला उत्कर्षदायक होय यांत शंका नाहीं.

चालू महिन्यांत भरणाऱ्या ' मध्य भारतीय साहित्य संमेलनाच्या ' ' कला आणि काव्य ' परिषदेच्या अध्यक्ष पदाचा बहुमान प्रस्तुत ' स्वल्पविराम ' पुस्तकाचे लेखक सुप्रसिद्ध शिल्पकार व साहित्य क्षेत्रांत टीकाकार व विनोदी लेखक म्हणून नांवाजलेले श्री. रघुनाथ कृष्ण फडके यांना देण्यांत येत असल्यामुळें या सुप्रसंगीं श्री. फडके यांचे विविध विनोदी लेख पुस्तक रूपानें प्रकाशित करणें समयोचित वाटून हा योग येत आहे. मालेला श्री. फडके यांची ही सर्व प्रकारें अत्यंत निरपेक्ष अशी देणगीच होय. माला त्यांच्या सर्वांगीण उत्कर्षाशिवाय अधिक काय चिंतणार ?

या पूर्वी प्रसिद्ध झालेल्या 'वेडापिसा' या पुस्तकाचें प्रकाशनप्रसंगीं धार दरबारनें मालेला उदार देणगी दिली, त्याचें सर्व श्रेय धार संस्थानचे दिवाण व कौन्सी-लचे अध्यक्ष दिवाण बहादुर के. नाडकर यांनाच दिलें पाहिजे. धार दरबारचा असाच कृपाश्रय असावा म्हणजे ही संस्था वाङ्मयिक व सांस्कृतिक उच्चाभिरुचि वृद्धिंगत करण्यास समर्थ होईल असा भरंवसा वाटतो.

विखुरलेल्या साहित्याला मूर्त स्वरूप आणणारी एक संस्था या दृष्टीनें 'सहकारी मुद्रणालयाचें' अभि-नंदन करणें योग्यच असून प्रस्तुत पुस्तकाचें छपाईचें काम अल्पावधींत समाधानकारक करून दिल्याबद्दल संतोष वाटतो.

नवापुरा, धार<br>
ता. २३-५-३७

**चिंतामण बळवंत लेले,** बी. ए.<br>
संपादक.

# हृद्गत

---

शिल्पकलेचा मुख्य व्यवसाय संभाळून त्यांत मिळ-णाऱ्या स्वल्पविरामांतील लेखन पुस्तक रूपानें प्रकाशित करतांना धार संस्थानचे दिवाण दिवाणबहादुर के. जी. नाडकर यांचा अंतःकरणपूर्वक उल्लेख करावासा वाटतो.

अकृत्रिम स्नेहभाव व थोरामोठ्यांचा कृपालोभ हें स्पृहणीय भाग्य आजहि माझ्याकडे सहृदयतेनें पहात असल्याची अपूर्व साक्ष दिवाण बहादुरांचा मजवरील कृपाप्रसाद देत आहे.

दिवाण बहादुर साहेबांची कलाभिरुचि, आस्था, वात्सल्य कर्तृत्व व थोरवी त्यांच्या अधिकार संपन्नतेला भूषणावह होय यांत शंका नाहीं. ललितकला विषयक आदर व गुणग्राहकता हे दिवाण बहादुरांचें वैशिष्ठ्य अपवादात्मकच म्हटलें पाहिजे. यांची साक्ष त्यांची प्रसन्न वृत्तीच देत आहे असें वाटतें. त्यांच्या सहवासाचा लाभ कोणालाही संस्मरणीय वाटून त्यांत वरील गुणविशेषाची

ओळख पटल्यावांचून रहात नाहीं. दिवाण बहादुरांचें सान्निध्य व कृपाछत्र म्हणजे ते एक कलेचे माहेरघरच म्हटले असतां चालेल ! महाराष्ट्रानें माझ्या कलाविषयक अल्प सेवेचा आजपावेतों केलेला गौरव, संरक्षण व संवर्धन करण्यांतील दिवाण बहादुर साहेबांची आस्था व कळकळ शब्दानें व्यक्त होण्यासारखी नाहीं. त्यांचें आभार मानावे तितके थोडेच होत !

लेखक,

**र. कृ. फडके.**

---

# स्वल्पविराम

## अनुक्रमणिका







# स्वल्पविराम

## अकलेचें प्रदर्शन

### अथवा

## ब्रह्मदेवाची घोडचूक



चार डोकीं एकत्र झालीं, कीं कोणता अनर्थ गुदरेल याचा नियम नसतो, आणि तो ब्रह्मदेवाच्या बापालाही टाळता येत नाहीं हें पुढील कथेवरून समजण्यासारखें आहे. उपलब्ध पुराणाशीं काहींसें विसंगत वाटणारें हें आख्यान केवळ पुराण-संशोधक चार डोक्यातून निघालेलें नसून प्रत्यक्ष सावळ्या गवळ्याला साक्षात् गोपाळ-कृष्णाचा दृष्टान्त झाल्यावरून त्याचा गुराचा गोटा खणता खणता नंदिकेश्वराची पद्यलिखित रोजनिशी सुदैवानें हातीं लागली आहे. विशेष आश्चर्याची गोष्ट म्हणजे ही रोजनिशी आंग्लमिश्रित मराठी भाषेंत लिहिलेली आहे ! यावरून एखादा नास्तिक अशी शंका घेईल कीं, हें कर्म कोणातरी नसत्या उपद्व्यापी पुराणसंशोधकाचेंच असलें पाहिजे; परंतु ही गोष्ट लक्षात घेऊनच कीं काय नंदीनें आरंभींच पुढील शेरा मारून ठेविला आहे:—

" लेडीज् ॲण्ड जन्टलमेन ! ही माझ्या ओन फुट राय-टिंगमधील डायरी नाईन्टीन् थर्टिन्मध्यें ख्रिसमस विकेशनच्या

मुटीनंतर पब्लिश व्हावयाची आहे. ती फॉर्च्युनेटली ज्याच्या प्रथम हँडमध्ये येईल तो सभ्य गृहस्थ नसो वा असभ्य स्त्री असो, त्याच्या मागण्यावर कम्प्लीट फेथ टेवावा अशी माझी रिक्वेस्ट आहे.

आपला

**स्वर्गवासी बंधु नंदिकेश्वर.**

या डायरीचा उद्‌घाटन-समारंभ हरिभक्तपरायण पाग्वाडे श्वरबुवा याच्या हस्तें झाला. त्या वेळीं त्यानीं मयूरेश्वर कवीच्या " शिववंदनकामाहीं वंदावा प्रथम देवनंदीन " ह्या आर्येचा प्रस्तुत डायरीच्या अनुरोधानें अर्थ लावून प्रत्यक्ष देवाच्या तोंडावर नंदीचें रहस्य उघडें करून सांगितलें असता देवाला ते मुकाट्यानें ऐकूनच घ्यावें लागलें. पाग्वाडेश्वरबुवांचें वरील आर्येसंबंधीं असें प्रतिपादन आहे की, देवाच्या दर्शनासाटीं नंदीला प्रथम विचित्र वंदन करण्याची ही रीत. कोणती ? आज एखाद्या रावबहादुराखेरीज कोणालाही हे पटण्यासारखे नाहीं. पट्टेवाल्याच्या वशिल्याने झालेला रावबहादुर प्रथम त्याला सलाम केल्याखेरीज साहेबाच्या खोलींत जाण्याइतका बेइमान नसतो ही अभिमानाची गोष्ट होय; परंतु म्हणून पट्टेवाल्यापेक्षा अधिक योग्यतेचा कोणीही मनुष्य पट्टेवाल्यापासून सलाम करीत जाईल हें संभवनीय नव्हे. अर्थात वरील आर्येचाही विपर्यस्त अर्थ झालेला आहे. ज्याला देवाचें दर्शन घ्यावयाचें असेल त्यानें नंदीकडे न जाता तडक देवाची गाठ घ्यावी असा सरळ अर्थ लावण्यासाटीं ' नंदीन ' या शब्दातील नकारार्थी

न ह्या व्यंजनाशीं बांधलेल्या नंदीला ओढून दूर केला म्हणजे यातील खरें इंगित सहज लक्षात येण्यासारखे आहे. नंदीची प्रथम गाठ पडून देवाचें रहस्य उघडें झालें तर देवाना भक्ताचें दर्शन घडण्याची आशाच करावयास नको. एवढ्यासाटीं नंदीला न भेटता देवाचीच एकदम भेट घ्यावी असे प्रस्तुत आर्येत सूचित केलें आहे. मुद्रणपिशाचाच्या ह्या खिळयाच्या खेळाने अशा प्रकारच्या अर्थाचा अनर्थ केला हे पाखाडेश्वरबुवाचें अचुक विवेचन ऐकून याबद्दल एखाद्या भ्रमिष्टालाही भ्रम उरणार नाहीं. या रोजनिशीच्या आधारें पाखाडेश्वरबोवानीं रचलेलें आख्यान त्याच्या रसभरित शब्दांत जसेच्या तसे सागणेंच उचित होय.

सृष्टि निर्माण करण्यासारख्या डोकेफोडीच्या कामात एका डोक्याचा टिकाव लागणें कठीण वाटून चार डोक्यांची कल्पना भगवानाच्या डोक्यांत डोकावते न डोकावते तोंच त्याच्या नाभिकमलाला जोराचा धक्का बसून तें देंटाच्या नाळेसह ब्रह्म-देवाला घेऊन वर उपटलें ! जननाचा हा विचित्र प्रकार पाहून नारायण पण मनात चरकल्यावाचून राहिला नाहीं ! साक्षात् लक्ष्मी कमलातूनच निर्माण झाली असली तरी धड भाऊपण म्हणता येत नाहीं व मुलगाही होऊं शकत नाहीं असले हे उपटसुंभ कार्टें क्षीरसागरात ढकलून द्यावें असें कमलामायेला वाटावें हें स्वाभाविकच होय ! याच्या उलट नारायणाच्या पोटांतील प्रगट झालेलें वात्सल्यप्रेम भ्रूणहत्येचें पातक पत्करण्यास

कसें प्रवृत्त होणार ? शिवाय संहार करण्याच्या पावसें नारा-
यणालाही नसल्यामुळें कायद्याचा अतिक्रम करणें शक्य नव्हतें !
शेवटीं पुष्कळ डोकें खाजविल्यानंतर भगवानांनीं विचार केला
कीं, असलीं विचित्र चार डोकीं तोलांत न ठेवलीं तर भलताच
अनर्थ ओढवेल; म्हणून नाभिकमलाच्या ठिकाणीं होत अस-
लेल्या असह्य वेदना सहन करून सृष्टि निर्माण करण्याचें काम
विधात्यानें तोल जाऊं न देतां कमलांवर बसून करावें अशी
त्याला आज्ञा दिली. परंतु यामुळें नारायणाला शंकरासारखें
वाटेल तिकडे भटकता येणें तर दूरच, परंतु उठून बसणेंही
अशक्य झाल्यामुळें नित्यनैमित्तिक व्यवहारांतही व्यत्यय येऊं
लागला. एखाद्या रोग्यासारखें निरंतर पाठीवर पडून राहणें
कंटाळवाणें वाटून न जाणों कदाचित् भगवान् क्षीरसागरांत
जीव देईल या भीतीनें नारद-तुंबरादिकांचा खडा पहारा अष्टौ-
प्रहर त्याच्या भोंवतीं राहून गायनादि निरनिराळ्या प्रकारांनीं
त्याचें मनरंजन करीत असत. चार डोकीं बेताल होऊं नयेत
म्हणून कमलाचा तोल संभाळण्यासाटीं भगवान् इतके जपत
होते तत्रापि क्षीरसागरावरील वाऱ्यानें तें कमल डोलूं लागलें,
म्हणजे विधात्याचा तोल राहणें कठीण पडे. शिवाय स्थलसंको-
चामुळें तो बेजार झाला म्हणजे डोकें ठिकाणावर न राहून
कामांत प्रमाणबद्धता राहणें दुरापास्त होई. चारीं डोकीं नीट
ठिकाणावर असलीं म्हणजे प्रत्येक डोक्याला निरनिराळ्या
कल्पना सुचून त्यांची एकवाक्यता होणें तितकेंच दुष्कर होत
असे ! कोठें सारखा डोंगराळ प्रदेश तर कोठें पाणीच पाणी !

## अकलेचें प्रदर्शन अथवा ब्रह्मदेवाची घोडचूक

एका ठिकाणीं झाडाझुडपांची इतकी दाटी, कीं उन्हाचा कवडसा पण दिसणें दुर्मिळ ! तर दुसरे ठिकाणीं सांवलीला पण झाडाचें पान देखील नाहीं असलीं वाळवंटें ! बहुमोल रत्नें कोळशाच्या खाणींत ! समुद्रांत मोतीं ! आणि सोनें तर मातींत मिसळून गेलेलें ! असली सृष्टींत दिसून येणारी अव्यवस्था वरील प्रकारच्या अनियंत्रितपणामुळेंच झालेली नाहीं तर काय ! सौंदर्याची सीमा समजली जाणारी स्त्री निर्माण करण्यांत तरी कोणती प्रमाणबद्धता आहे ? नर नारी हा भेद उत्पन्न करण्यात चार डोक्याचा मतभेद झालेला असला पाहिजे, नाहीं तर यापासून केवढे अनर्थ गुदरतील याची कल्पना एका डोक्यांतही येऊं नये ? तशात हीं डोकीं शास्त्रीय पडल्यामुळें नवे नवे शोध करून पाहण्यासाटीं पुढला मागला विचार थोडाच करणार ? सृष्टि निर्माण करण्यासाटीं वाटेल तो खर्च झाला तरी हरकत नाहीं; परंतु स्वर्गांतही अकलेचा पुरवटा बेताचाच असल्यामुळें त्याला हात लावता कामा नये अशी प्रत्यक्ष भगवानाची ताकीद असता अकलेचा प्रयोग करून पहाण्याचा मोह या चार शास्त्रीय डोक्यांना आवरेनासा झाला. एखाद्या प्राण्यात थोडी तरी अक्कल घालून पहाण्याची दुर्बुद्धि ब्रह्मदेवाला आटवली ! हुकुमाबाहेर अकलेची अफरातफर केल्यास स्वतःची अक्कल पण जप्त व्हावयाची या भीतीनें आपल्या चार डोक्यांपैकीं तीन डोक्यांतील अक्कल खर्च करण्यास विधाता तयार झाला ! त्यांतल्या त्यात त्यानें इतका शहाणपणा दाखविला कीं, हत्तीसारखा बलाढ्य अथवा वाघासारखा क्रूर प्राणी उपयोगांत न घेतां मर्कटासारख्या

दुबळ्या जिवावर हा प्रयोग करून पाहण्याचें चार डोक्याच्या बहुमतानें ठरलें.

माकडाच्या मगजात अकलेचा प्रवेश होतो न होतो तोंच त्याचा मेंदू विकास पावून त्यांनीं अर्धवट अकलेच्या मर्कट-चेष्टांनीं साक्षात् भगवानालाही त्राहि भगवान् करून सोडलें ! स्वतःला निर्माण करणारा ब्रह्मा कोठून आला असावा या बुध्दि-विशेष जिज्ञासेनें तो पाहूं लागला तों त्याची जिज्ञासा अधिकच प्रज्वलित झाली ! बारीक देठाच्या कमलातून ब्रह्मदेव निघालेले पाहून हें कमल तरी कुठें उगवलें आहे याचा शोध लावण्यासाठीं तो आपल्या शेपटानें भगवानाची नाभि चाचपूं लागला. नारायणाची स्वारी अर्धवट झोंपेच्या स्वप्नसृष्टींत वावरत होती; परंतु असला कांहीं प्रकार होत आहे हें त्याच्या स्वप्नीं पण नाहीं ! शंकराची गाठ घेण्यासाठीं स्मशानात गेल्याचें भयानक स्वप्न त्यांना पडत होतें. आधींच स्मशानातील भुताखेतानीं भेदरून गेलेला त्याचा जीव शंकराची स्वारी दिसेतों अधिकाधिक कासावीस होत चालला होता. शेषावर शयन करणाऱ्या आदि-देवाला दोरीचा स्पर्शही घाबरें करण्यास पुरेसा होता. अर्थात् माकडाच्या शेंपटीच्या स्पर्शानें भगवान् किंचाळतच उठले ! अष्टौप्रहर चरण चुरीत बसलेल्या आदिमायेचा नुकताच कोठें डोळा लागला होता. पतिदेवांची आर्त किंकाळी ऐकून ती पण घाबरून उठली. दिवसभर कलागती लावून थकलेभागलेले नारदमुनि दुसऱ्या दिवसाच्या कलागतींची खूणगाठ शेंडीला

मारून तंबोरीच्या कुशींत लेटले होते. तुंबराच्या गळयातून निघणारे आरोह–अवरोह स्वर गाण्याचे नसून घोरण्याचेच असावेत हें तो कांहीं केल्या जागा होईना एवढ्यावरून सांगता येतें ! दिवा लावण्यासाठीं उशागतीं ठेवलेली आगपेटी आदि-माया पाहूं लागली. तों ती मर्कटानें आधींच लांबविली होती. शेषाच्या मस्तकावरील मणिप्रकाशाला पृथ्वीचें भ्रमण आड आलें. इतकी अनुकूल परिस्थिति मिळाल्यावर कपीच्या अगाध चेष्टा काय काय वदाव्या ! विष्णूच्या नाभीचा नाद सोडून नारदाचे तंबोरीवर त्यानें हात टाकतांच त्यातून निघालेल्या प्रतिकारध्वनीनें चिडून जाऊन त्यानें तारांचे बारा वाजवले ! भोंपळा तरी हातीं यावा या भ्रमानें नारद पुढें सरसावतात तोंच उभ्या शेंडीची शेपूट त्याच्या तोंडात कोंबून स्वतःच्या शेपटीनें त्यानें तुंबराला खेकाळावयाला लावलें ! शेषाचा फूत्कार कानीं पडतांच त्याच्या फण्यावर ओरखडा मारल्याबरोबर पृथ्वीच विष्णूच्या डोक्यावर आदळण्याचा प्रसंग आला ! इतक्यात नारदानें बिनतारी विद्युत् संदेशद्वारा हा अनर्थ शंकराला कळविला. अर्धवट शुद्धींत असलेल्या गंगाधराला हा कांहीं तरी भांगेचा प्रकार आहे असें वाटून उरलीसुरली भांग टोकून त्यानें तंद्री लावून दिली ! इतक्या कालावधींत मर्कटाच्या हजारों प्रति बाहेर पडलेल्या पाहून देवांना निराकार झाल्यावांचून गत्यंतरच उरलें नाहीं ! सर्व देव दिसेनासे झाले, तेव्हां ते क्षीरसागरात दडून बसले असावेत असें वाटून माकडांनीं आंत

उड्या घेतल्या ! भगवानानें मत्स्यावतार धरून त्यांना मृत्यु-लोकात पिटाळून लावलें, तेव्हां देव निर्धास्त झाले.

ब्रह्मदेवाला तोंड दाखविण्याची चोरी होऊन तो कमळात डोकें खुपसून बसला. ब्रह्मा इतका खजिल झालेला पाहतांच विष्णूला गहिंवर येऊन त्याच्या चार तोंडांत देण्याऐवजीं त्याला नुसती ताकीदच देण्यांत आली. या अभयामुळें ब्रह्मा वर डोकें काढतो तोंच त्याच्या डोक्यांत विचारांचें काहूर माजलें. थोड्याशा अकलेनें इतका अनर्थ कां व्हावा या विचारात शास्त्रीय डोकीं पडलीं; अकलेचें प्रमाण थोडें झालें हेंच त्याचें कारण असलें पाहिजे हें एका डोक्यांत आल्यावाचून राहिलें नाहीं. तथापि कितीही डोकेंफोड करून सांगितलें तरी बाकीच्या डोक्यांना तें पटेना. तेव्हा अर्थातच प्रत्यक्ष प्रयोग करून दाखविल्याशिवाय इलाजच नाहींसा होऊन माकडाच्या तयार करून ठेवलेल्या मगजात अकलेचें प्रमाण वाढवून मनुष्यप्राणी निर्माण करावा लागला. शास्त्रीय दृष्ट्या हें अगदीं बरोबर असलें तरी अनुभव मात्र अगदींच उलट आला. हा मानवप्राणी केवळ चेष्टा करण्याच्या नादीं न लागता भस्मासुराप्रमाणें ब्रह्मदेवाच्याच मस्तकीं हात ठेवण्याचा घाट घालूं लागला. ज्योतिषी ब्रह्मलिखित हस्तगत करण्याच्या नादीं लागले. यमाचें कार्य बंद पाडण्याच्या प्रयत्नांत धन्वंतरी गर्क झाले ! शिवकंठांतून हलाहल ओकविण्याचा बेत दुर्जनांनीं ठरविला. वकील वक्त्यांनीं बृहस्पतीचें तोंड बंद करून टाकलें. लक्ष्मीच्या अभिलाषानें

## अकलेचें प्रदर्शन अथवा ब्रह्मदेवाची घोडचूक

श्रीमंत सावकारांनीं कुबेराला दरिद्री करण्याची महत्वाकांक्षा धरिली. शास्त्रीय शोधकांनीं पंचभूतांना काबीज केलें. अशा प्रकारें या नवीन ओढवलेल्या अनिवार्य आपत्तीमुळे देव चिंताबल होऊन काळवंडूं लागले ! ही विघ्नवार्ता दुःखहर्त्या लंबोदराच्या गजकर्णावर घालावी असें सर्वानुमतें ठरून प्राणांतिक अवस्था झालेल्या देवांनीं नारदमुनींच्या चंचींतील सुपारीवर गजाननाची प्राणप्रतिष्ठा त्राण आहे तों करून घेतली. गर्भगळित झालेल्या देवांना उठून उभें राहणें अथवा तोंडून शब्द निघणें दुरापास्तच झाल्यामुळें सर्व देव वाळवंटावर बसून आळीपाळीनें व दमादमानें " सुखकर्ता दुःखहर्ता " ही आरती आर्त स्वरात म्हणूं लागले. चतुर्थीच्या मोदकांनीं अजीर्णांश होऊन गणरायाची स्वारी काहींशी बेजारच होती, त्यात मंत्रजागरणाची भर पडून पित्तांशही वाढला होता; ग्यासलेटच्या बत्त्याचा धूर आणि विसर्जनाचें आंबट दही कफाचा प्रादुर्भाव करण्यास कारणीभूत झालें. मूळच्या वातुळ प्रकृतीला मंत्रजागरणातील आटवलेलें मसाल्याचें दूध वावडें होऊन वातविकार उत्पन्न झाला. या त्रिदोष स्थितींत निद्रेचा आराम कोठून मिळणार ? पहांटेच्या भूपाळ्यात जरा आराम पडून थोडी झोंप लागते न लागते तोंच देवांचीही आर्त वाणी चिलटांच्या गुणगुणाटाप्रमाणें वक्रतुंडाच्या कानीं आली. ते जागे होऊन घड्याळाकडे पाहतात तों देवांचे बारा वाजलेले ! प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें गणरायाला इकडे कानाडोळा करणें भागच झालें. ते पुन्हा जरासे लेटतात न

लेटतात तोंच " यज्ञेन यज्ञमयजंत " हा पंचम स्वरित मंत्र कानीं पडला. ओरडा थांबत नाहींसें पाहून उठावें असें त्याच्या मनांत आलें. परंतु आधींच लंबोदर त्यात मांड्या आंखूड आणि त्यावर ऋद्धि सिद्धि बसलेल्या, उंदीरमामा रात्रीं कुटें मेळे पहावयाला गेले होतें तेथें एका दुष्ट बोक्यानें त्यांच्या नरडीचा घोट घेतल्याची दुःखकारक वार्ता धावत धावत येऊन एका चिचुंदरीनें विदित केली ! अंतकाळीं उंदिरमामानें गजाननाचा केलेला धांवा पुष्कळांनीं ऐकला असें म्हणतात; परंतु झोंपेंत गजकर्णाच्या कानीं तो न गेल्यामुळें बोक्याला आपला डाव साधता आला. मृत्युपत्र करण्यासही सवड न मिळाल्यामुळे बिचाऱ्या उंदीरमामाच्या पोराबाळांना आज भिंती पोखरीत बसणें नशिबीं आलें. अशा प्रकारच्या स्वतःवर कोसळलेल्या आपत्ति ज्या विघ्नहर्त्याला टाळता येईनात तो शिष्टाचाराप्रमाणें कान पाखडून मोकळा होण्यापलीकडे अधिक तें काय करणार ?

घसा कोरडा पडला तरी सुखकर्त्याचा पत्ता नाहीं असे पाहून देवांनीं अखेर भोलानाथ शंकराकडे जाण्याचा विचार ठरविला.ही स्वारी कोठें असेल याचा काय नियम ?तथापि स्मशानांत तरी पत्ता लागेल असें वाटून देवांनीं स्मशानाचा रस्ता धरला. त्याच्या अंदाजाप्रमाणें दिगंबराचें दर्शन दुरूनच झालें ! पार्वतीदेवीच्या शिवरात्रीच्या व्रतस्थपणावर चिडूनच कीं काय सदाशिवजी डोक्यांत राख घालून स्मशानांत येऊन बसले होते. भडकलेल्या डोक्यांत भांगही चढेनाशी झाल्यामुळे त्यांची वृत्ति

अधिकच खवळल्यासारखी दिसत होती ! देवाचा हा तांडा दुरून येतांना पाहून त्याचा क्रोधाग्नि अनावर भडकला ! " पुढे याल तर जाळून भस्म करीन ! आलात तसेच त्या विष्णयाकडे जा नाहीं तर मसणात मरा ! असें म्हणून गिरिजापतींनीं नंदीला इशारा देताच 'भीक नको पण कुत्रा आवर' अशी देवांची स्थिति होऊन, नंदीनें पिटाळून लावण्यापूर्वीच देवांनीं काटशह काढला. गर्भगळित झालेले देव निराशेनें देहविसर्जन करण्याच्या इराद्यानें क्षीरसागराकडे वळले. इतक्यांत नारायणाच्या पाटीला सर्पदंश होऊन तो जागा झाल्याची आनंददायक बातमी त्यांना समजली. लगेच द्रोणाच्या होड्या करून देवांनीं क्षीरसागरात उड्या घेतल्या. नारायण विव्हळतच पडले होते. त्यात आणखी आदिमायेला दोन दिवस मलेरिआचा ताप आल्यामुळें नारायणाचे पाय पुरीप्रमाणे सुजून सारखे ठणकत होते ! अर्थात् पायाला हात लावण्याची सोय नाहींसे पाहून देवांनीं दुरूनच वंदन केल्यानंतर पुढील वृत्त निवेदन केलें.

क्षीरसागरांतील दयासागर नारायणानें स्वतःच्या वेदना सहन करुन पुढील भाषणाने देवांची समजूत घातली. ते म्हणाले " अक्कल ही अमूल्य चीज खरी; तथापि ती योग्य प्रमाणात नसेल तर कसा अनर्थ होतो याचा कटु अनुभव मर्कटचेष्टांनीं आणून दिलेलाच आहे ! मानवाच्या ठायीं वाजवीपेक्षा फाजील अकलेचा प्रादुर्भाव झालेला असल्यामुळें अर्धवट अकलेच्या परि-णामाप्रमाणें त्याबद्दल भिण्याचे तिळमात्र प्रयोजन नाहीं; श्रद्धे-

शिवाय ज्ञानप्राप्ति नाहीं. अधिक शहाणपणानें श्रद्धाबुद्धि नष्ट होऊन उलट अज्ञानाचें प्राबल्य होईल. ज्ञानावांचून सत्याची ओळख देखील पटावयाची नाहीं. निसर्गाचें अगाध गूढ उकलूं पहाणें फाजील अकलेचें काम नव्हे ! ज्योतिष-शास्त्रज्ञांनीं ब्रह्मलिखित हस्तगत व्हावें म्हणून ग्रहगणिताचा कीस काढला तरी अगाणित सृष्टिनियमाचें आकलन त्यांच्या देवालाही होणार नाहीं ! क्षयासारख्या दुर्धर रोगाचें निवारण साक्षात् सुधापतीला होईना तेथें नसत्या दुर्बल वनस्पतीच्या जोरावर, जिवाचा थांग लागल्याखेरीज, यमाचें कार्य कोण बंद पाडूं शकणार ? अभिलाषबुद्धीनें श्रीमंतानीं लक्ष्मीकडे वळवलेली दृष्टि अंध झाल्यावांचून कशी राहील ? वकील वक्त्यांचें वक्तृत्व आपापसांत तंटे उत्पन्न करण्यापलीकडे अधिक तें काय करूं शकणार ? शास्त्रीय शोधकांना पंचमहाभूतें काबीज केल्या-बद्दल घमेंड होईल तर ती निमिषार्धांत उतरण्यास एकच महाभूत पुरेसें आहे ! एक गोष्ट मात्र जरा चिंताजनक वाटते. ती म्हणजे ज्या दुष्ट हालाहलाचा स्वीकार शंकराखेरीज कोणालाही करतां आला नाहीं त्याच्या प्रादुर्भावानें खलाचें प्राबल्य वाढलें तर मात्र देवाचा धर्माचा आधार नष्ट होण्याचा संभव आहे. परंतु अशी वेळ येईल तेव्हा " धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे " असें भगवंतानीं अभय वचन देऊन देवाना निर्भय केलें ! "

मानवी बुद्धीबद्दल नारायणाचा हा अंदाज प्रत्यक्षाला किती धरून आहे हें प्रस्तुत लेखावरूनच समजण्यास हरकत

नाहीं. तथापि त्याची अधिक सत्यता पटावी म्हणून कांहीं ठळक ठळक उदाहरणें पुढील लेखांकांत द्यावयाचें योजिलें आहे. या अकलेच्या प्रकाराला ' ब्रह्मदेवाची घोडचूक ' कारणीभूत असली तरी तिचें उघड प्रदर्शन करताना अप्रत्यक्षपणें व स्वभावजन्य अज्ञानपणें घडलेल्या दयाघन प्रमादांबद्दल स्तुतिप्रिय प्रभूची "क्षमस्व परमेश्वर" अशी अनन्यभावें प्रार्थना करणें उचित आहे. तथास्तु !



# 'मी' आणि 'माझें लेखन'

१. माझें "आत्मवृत्त" मला सर्वांत विशेष आवडतें. इतकें अद्भुतरम्य लिखाण माझ्या हातून दुसरें क्वचितच लिहिलें गेलें असेल. दुकानदारास तर या ग्रंथाची विशेषच गोडी लाग ल्याचें दिसून येतें. बाजारांतून आणलेल्या पदार्थांभोंवतीं गुंडाळ लेल्या कागदांत माझ्या "आत्मवृत्ता"चा भाग हटकून आढळतो. सिगारेटच्या तिकिटाप्रमाणें मी हे कागद संग्रहित करूं लागलों तर या अपूर्व ग्रंथाची बिनखर्चानें दुसरी आवृत्ति तयार होईल.

२. जी गोष्ट आपणांस आवडली ती हरप्रकारें आपलीशी करून घेणें हा माझा स्वभावधर्म असल्यामुळें संग्रह अथव उसनवारी हीच माझ्या लेखांतील बहुतेक मध्यवर्ति कल्पना असते.

३. काहीं लेखनाला अपरात्रीइतकी दुसरी सुरक्षित वेळ नाहीं. संग्रहाचें कार्य वेळीं अवेळीं वाटेल तेव्हां करतां येतें. स्थलवर्णनासाठीं मात्र मला एखाद्या चित्रकाराप्रमाणें प्रत्यक्ष "स्पॉट" वरच गेल्याखेरीज भागत नाहीं. नाहीं म्हणायल "यमाचा दरबार" ही गोष्ट मात्र मला केवळ कल्पनेवरच भिस्त ठेवून लिहावी लागली.

४. स्वतः लिहिण्याचा मला लहानपणापासूनच मनस्वी कंटाळा. शाळेंतील शुद्धलेखन देखील मी कधीं स्वतः लिहिल्याचें

मला आठवत नाहीं. " हिला " लिहावयाचें प्रेमपत्रसुद्धां मी एखाद्या बाल-विद्यार्थ्याकडून लिहवून घेतों.

५. लिहिते वेळीं विडी-पान-सुपारी सेवनाची मला इतकी खोड आहे कीं, त्यांतच तद्रूप होऊन लिहिण्यासही फुरसत सापडणें मुष्किलीचें पडतें. चहाविषयीं तर पहावयासच नको. चांगलें डोकें फिरेतों तो ढोसावा तेव्हां कुठें चार सुसंबद्ध विचार सुचण्याची आशा.

६. एकांतांत असलों कीं, मृत पत्न्यांचें स्मरण होऊन कांहींच सुचेनासें होतें. आणि विद्यमान कांता जवळ असली म्हणजे एकांताची आशाच करावयास नको. एकूण या स्त्री-संबंधांनीं माझ्या वाङ्मय-संसाराचें बरेंच नुकसान केलें आहे.

७. माझ्या " कॉमेडीज् " वाचून देखील वाचकास ट्रॅजिडीइतकेंच दुःख होत असल्याचें माझ्या ऐकिवात आल्यापासून स्वतंत्र " ट्रॅजिडी " अशी लिहिण्याचें मला कारणच पडत नाहीं.

८. लिहिण्यास बसण्यापूर्वी कांहींतरी लिहावयाचें येवढेंच माझें ठरलेलें असतें. मग ओघाओघानें काय होईल त्याचा नियम नसतो. एकदां तर मी लघुकथा लिहिण्याच्या ओघांत असा कांहीं सांपडलों, कीं अखेर ती कादंबरी म्हणून दोन खंडांत प्रसिद्ध करावी लागली.

९. माझी पहिली कृति बहुतकरून मी लिहिलीच नसावी असा माझा तर्क आहे. प्रकाशनाच्या बाबतींत तर जवळ जवळ

निराशा झाल्यासारखीच होती. शेवट तेवढ्यासाठीं लोकांच्या वर्गणीवर स्वतःचें मासिक काढावें लागलें.

१०. केवळ लेखनावर चरितार्थ चालविता येणारच नाहीं असें म्हणतां येत नाहीं; परंतु त्याला दस्तऐवज खतपत्र वगैरे लिहिण्याचें ज्ञान करून घ्यावयास पाहिजे.

११. स्फूर्तीच्या लहरी व चंचलपणामुळें माझे स्फूर्तिदायक बरेच लेख अपुरे राहून वाङ्मयाचें भलतेंच नुकसान झालें आहे. एक वेळ तर मला स्फूर्ति झाली त्या वेळीं मी अगदीं गाढ झोंपेंत असल्यामुळें तिचा कांहींच उपयोग करून घेता आला नाहीं.

१२. स्वतःच्या कृतीपेक्षां त्यावरील टीकांमुळेंच विशेष प्रसिद्धि होत असते व त्या दृष्टीनें आपलें लिखाण जितकें गचाळ असेल तितकें अधिक चागलें असा माझा खास अनुभव आहे.



**टीपः—एका साप्ताहिकानें वरील बारा प्रश्न सुप्रसिद्ध लेखकांस विचारले होते. तेंच प्रश्न घेऊन त्यांचीं उत्तरें उपहास व विनोदात्मक अशीं या तीन लेखांत दिलीं आहेत.**

# मी आणि माझें लेखन

माझें सर्वच लेखन मला इतकें कांहीं आवडतें कीं त्यांत कमी अधिक टरवणें सुद्धां मला आवडत नाहीं. श्रीखंडा-वरील माझा शास्त्रीय लेख वाचून तर आचार्यांनीं देखील तोंडात बोट घातलें. कांहींना तर तो इतका गोड वाटला कीं, त्यामुळें त्याचा मधुमेहाचा विकार वाढल्याच्या तक्रारी माझ्या कडे येऊं लागल्या. माझा विनोद कसा हृदयस्पर्शी असतो हें "अंतकाळच्या वेदना" या माझ्या लघुकथेवरून समजण्या-सारखें आहे.

( २ ) प्रसंगाशिवाय मला कल्पना मुळींच सुचत नाहींत. मला पाहिजे असलेला प्रसंग कित्येक वर्षें घडून न आल्यामुळें माझी एक सुंदर कल्पना तशीच पडून राहिली होती तिला; गेल्या सालीं शेजारच्या गोविंदभटाचें घर जळालें तेव्हां मूर्त स्वरूप आलें.

( ३ ) उपाशीपोटीं मला अन्न देखील गोड लागत नाहीं, म्हणून मी लिहिण्यास बसण्यापूर्वी खाण्यासच बसतो. आणि खाल्या अन्नाची सुस्ती येण्याच्या दरम्यान जें काय लिहून होईल तेवढेंच पचनक्रियेबरोबर लिहिलेलें वाचकांच्याहि पचनीं पडण्यास टीक पडत असावें असा माझा समज आहे.

( ४ ) तोंडीं सांगून असलीं कामें होत नसतात. तीं दुसऱ्याकडून करवूनच घ्यावीं लागतात; आणि तेवढ्यासाठींच

दुसऱ्याकडे काय तोंड वेंगाडावें लागेल तितकेंच, एरव्हीं प्रेसमध्यें अगर संपादकाकडे पाठविण्याच्या फेअर कॉपीला मी दुसऱ्याचा हात लागूं देत नाहीं.

( ५ ) लिहितांना माझा पाड्या कुत्रा जवळ असला कीं मला तद्रूप होण्यास वेळ लागत नाहीं, आणि मध्येंच डुलकी येऊं लागली म्हणजे त्याच्या वाऱ्याबरोबर भोकण्यानें मी जागा होऊन लिहूं लागतों. या कामीं मला त्याच्याकडून होण्याऱ्या अमूल्य साहाय्याबद्दल मी दर प्रस्तावनेंत त्याचे मनःपूर्वक आभार मानून मनांत आणलें तर आम्ही कुत्र्याइतकेहि कृतज्ञ असूं शकतों हें प्रत्यक्ष कृतीनें सिद्ध केलें आहे.

( ६ ) फक्त शृंगारविषयक लेखनापुरतीच मला एकांताची गरज भासते; एरव्हीं मी भर चवाठ्यावर देखील वाटेल तें लिहूं शकत असल्याचे दाखले कित्येक घरांच्या भिंतींवर अद्याप देखील दाखवितां येतील.

( ७ ) कांदबरी पुरी होते वेळीं मी ज्या परिस्थितींत अगर " मूड " मध्यें असेन त्याप्रमाणें तिचा शेवट करणें मला अपरिहार्यच होतें. पाहुण्यांचा सुळसुळाट, अहेर करण्याचे नाइलाजाचे प्रसंग, पैशाची ओढघस्त अशी स्थिति कादंबरी संपविते वेळीं असली म्हणजे ती कॉमेडी होईल ही आशाच करावयास नको. अशा वेळीं एकाद्या भयंकर सांथीच्या रोगाप्रमाणें उग्रावतार धारण करून कादंबरींतील एकाहि पात्राला मी जिवंत राहूं देत नाहीं. नाहीं म्हणावयाला प्रथम-पत्नी

निवर्तल्यानंतर व द्वितीय संबंध करण्यापूर्वी जो वैराग्याचा काळ लोटला त्यांत "दुःखांतील सुख" ही एक कॉमेडी लिहिली तेवढीच काय ती.

( ८ ) मला कांहीं सुचेनासें झालें म्हणजेच मी लिहावयास बसत असल्यामुळें कथानक केव्हां सुचतें तें सांगता येत नाहीं. आणि त्यांत लिहिताना डुलकी येण्याची मला वाईट खोड असल्यामळें केव्हां केव्हां तर फारच गमंत होते. एकदा असाच लिहावयास बसलों. पांड्या कुठें गेला होता कोणास माहीत ? केव्हां डुलकी लागली तें देखील समजलें नाहीं. आणि झाली झालं स्वप्नाला सुरुवात. मी लिहिण्यास घेतलेली कादंबरी पुरी होऊन एका संध्याकाळीं प्रसिद्ध होते न होते तोंच सकाळला पहिली आवृत्ति खलास झालेली; वर्तमानपत्रांतून येणाऱ्या स्तुतिस्तोत्रांमुळें तर दोन दिवस संपादकांना अग्रलेख देखील बंद ठेवावे लागले. पानसुपाऱ्यांचा तर माझ्यावर इतका कांहीं भडिमार झाला कीं गांवांत खाण्याला पान मिळेना. हारतुऱ्या-पायीं फुलझाडेंहि बिचारीं मेटाकुटीस आलीं. अखेर अखेर दूर्वांकुरांचे तुरे करून प्रसंग साजरा केला. हां हां म्हणता दुसरी आवृत्तिहि संपत आलेली पाहून प्रेसच्या मालकानें स्टीरीयो टाईप करून घेतला आणि तिसऱ्या आवृत्तीच्या वेळीं मी जागा झालों आणि पहातों तों एक अक्षर लिहिलें असेल तर शपथ.

( ९ ) मी अगदीं बालवयांतच लेखनाला आरंभ केला असल्यामुळें त्या वेळची स्मृति असणेंहि शक्य नाहीं. तथापि

त्यानंतर मी शाळेंत जाऊं लागलों इतकें मात्र मला साधारण आठवतें. माझी पहिली कृति छापताना फारशी अडचण पडली नाहीं आणि नंतरहि प्रेसचा मालकच नापत्ता झाल्यामुळें देण्याघेण्याची भानगड आपोआपच मिटली.

( १० ) माझ्या लेखनांतून अर्थनिष्पत्ति होणें कठीण आहे हें जेव्हां मला कळून चुकलें तेव्हांपासून दिवाळसणाच्या निमित्तानें दर दिवाळीला सासुरवाडीला जाऊन तेथेंच लिहिण्याचें कार्य उरकून घेतों आणि यामुळें लिहिण्यापुरती चरितार्थाची अडचण मला केव्हाच भासली नाहीं.

( ११ ) स्फूर्ति व्हावी म्हणून मी रात्रंदिवस तळमळत असें. एकदा तर एकाच्या सांगण्यावरून थोडी भांगसुद्धा घेऊन पाहिली; परंतु रामा शिवा गोविंदा ! उलट दुर्दैव पहा काय तें, त्या भांगेच्या भ्रमांत होतें नव्हतें तेवढें सारें लिखाण फाडून मात्र टाकलें.

( १२ ) टीकाकारांनीं माझ्या लेखनाची कुतरओढ चालविलेली पाहून पांड्यासारखा चांगला चावरा कुत्रा पाळल्यापासून माझ्या वाटेस कोणी जाईनासें झालें आहे.



# " मी आणि माझें लेखन "

लोकांची आवड पाहून लिहिण्याच्या मोहाला मी कधींच बळी पडत नसल्यामुळें माझें लोकांना न आवडणारें बहुतेक लिखाण माझ्या फार आवडीचें आहे; इतर लेखांशीं माझा नांवापुरताच संबंध असल्यामुळें ते केवळ लोकांना आवडतात एवढेंच त्यांसंबंधीं मला आवडण्यासारखें आहे. माझ्या वाङ्मयकृतिपैकीं नाटकांत " धुमाकूळ " कवितेंत " आक्रोश " गोष्टींत " पाल्हाळ " टीकेंत " सूड " निबंधांत " निर्बंधन " विनोदांत " किळस " गुजगोष्टींत " चुंबन " आणि नाटकेंत " वाटेल तें " या कृतिविशेष आवडीच्या असून चालू कादंबरींत शेवटलें प्रकरण मला नेहमींच फार आवडतें.

( २ ) माझी कल्पना इतकी कल्पनातीत स्वतंत्र आहे कीं ती कसलेंच बंधन न जुमानता वाटेल तें करण्यास मागें पुढें पहात नाहीं. यामुळें एखादे वेळीं मी प्रसंगात सांपडलोंच तर ऐन वेळीं सुचणाऱ्या कल्पना अर्थातच त्या प्रसंगावरून सुचतात हें उघडच होतें. तिकिटाशिवाय नाटकगृहांत प्रवेश करून घेण्याची कल्पना माझ्या डोक्यांत आल्यामुळें जो प्रसंग गुदरला त्यावरून " अर्धचंद्र " या शोकरस काव्याची मला स्फूर्ति झाली. बालवयातहि माझी कल्पनेची भरारी कांहीं कमी होती असें नाहीं. " सेफ " सारख्या सुरक्षित ठिकाणींहि ती एकदा प्रविष्ट होऊं शकली. आणि या गुणांबद्दल योग्य

उत्तेजन मिळतें तर आज लेखनव्यवसायावर अर्धपोटीं राहण्याचा प्रसंग आला नसता. आतां या व्यवसायांत देखील सदरहू गुणांचा उपयोग करून घेतां येत असल्यामुळें एक वेळची तरी चरितार्थाची सोय भागत आहे. असो. एक दिवस एकाएकीं प्रस्तावनाच लिहिण्याची कल्पना सुचली. या प्रस्तावनेसाठीं नंतर नाटक लिहिण्याच्याहि विचारांत होतों, परंतु सदरहू प्रस्तावना नाटकाच्या पुस्तकाला साजेना. कारण त्यांत योग्य त्या सूचना केल्याबद्दल विद्वान् मित्रांचें, द्रव्यसाहाय्याबद्दल सावकाराचें, नाटक बसवून चांगलें वठवल्याबद्दल नाटक मंडळींचें, जसेच्या तसेच फोटो काढून दिल्याबद्दल फोटोग्राफरचें, पैसे घेऊन नाटक छापून दिल्याबद्दल छापखानेवाल्याचें, पदाच्या चालीसाठीं पाय धरावे लागणाऱ्या खांसाहेबाचें, नाटकाचे पैसे वसूल करून दिल्याबद्दल दिवाणी कोर्टाचें आभारप्रदर्शन केलेलें नसल्यामुळें प्रस्तावनेला जुळती येईल अशी कादंबरी लिहिली, पण ती प्रस्तावनेच्या मानानें फारच लहान झाल्या-कारणानें एखादा प्रचंड ग्रंथ लिहिल्याखेरीज उपायच नव्हता. त्यालाहि द्रव्यसाहाय्य त्या मानानें अधिकच लागणार हें लक्षांत येऊन दुसऱ्या कोणाला प्रस्तावनेची जरूर असल्यास पहावी म्हणजे अनायासेंच दोघांचेंहि काम होऊन दुसऱ्याच्या ग्रंथाला प्रस्तावना लिहिल्याचा अपूर्व मानहि मिळेल या दुहेरी हेतूनें "पांचजन्य" पत्राच्या स्पेशल "फाल्गून" अंकात जाहिरात दिली. परंतु प्रस्तावना लिहून देणारे बरेच बोकाळले असल्याचें प्रत्ययास आलें; कारण सबंध फाल्गून महिना गेला

तरी मागणीच्या नांवानें पांचजन्यच ! कर्मधर्मसंयोगानें याच सुमारास एक मोटा नामांकित लेखक मरण पावला; त्याच्या अपुऱ्या राहिलेल्या "शालजोडींचें टिगळ" या विनोदात्मक लेखाला उपसंहाराची गरज लागून त्या ठिकाणीं माझ्या प्रस्तावनेचा मूल्य घेऊन अमूल्य उपयोग झाला !

( ३ ) मी लिहावयास बसतों तीच माझी खरी लेखनाची वेळ; याखेरीज माझ्या इतर लेखनाच्या वेळा नाहींत असें नाहीं. परंतु त्यावेळीं मी कधींच लिहावयास बसत नाहीं. उदाहरणार्थ स्नानाच्या वेळीं मला लिहिता येणार नाहीं असें नाहीं. पण मग लिहिण्याच्या वेळीं स्नान करावें लागून लिहिण्यावर पाणी पडावयाचें. तसेंच भोजनाचे वेळीं लिहिण्याचें मनांत आणलें तर जेवणावाचून अन्नाला आंचवावें लागेल. अशा अनेक अडचणींमुळें ज्यावेळीं कांहींच उद्योग नसेल अशा वेळीं लिहिण्याचें ठरवून टाकल्यामुळें लिहिण्यास भरपूर वेळ सांपडतो. एकदा लिहूं लागलों म्हणजे मला कशाचेंच भान रहात नाहीं आणि मग वेळापत्रकाप्रमाणें एकादी गोष्ट वेळेवर होऊं शकत नाहीं, ही अडचण लक्षांत आल्यापासून वेळापत्रकाला घड्याळाप्रमाणें दोन कांटे लावले आहेत. त्यांपैकीं एक काम व दुसरा वेळ दाखविणारा असून कांहीं करण्यापूर्वी, कामाच्या व वेळाच्या अनुरोधानें वेळापत्रक लावून ठेवून मग कामास लागतों. असें केल्यानें वेळापत्रकाप्रमाणें कामें केल्यासारखें होऊन त्याचाहि बोज राखल्यासारखें होतें. एक दिवस

मात्र घड्याळाला चावी देण्याची वेळापत्रकांतील वेळ चुकली आणि लिहिण्याच्या भरांत घड्याळ बंद पडल्याचें लक्षात न आल्यामुळें ऑफिसांत जातों तों जिकडे जिकडे अंधेर! रात्र झाल्याचें ध्यानीं येतांच डोळ्यापुढेंहि अंधेरी आली. तसाच अंधेरीस जाऊन साहेबाची भेट घेतली व खरा प्रकार सांगितला. तेव्हां तो माझ्याकडे पाहून हसूंच लागला. मला याचा अर्थच कळेना. मी वेड्यासारखा त्याच्या तोंडाकडे पाहूं लागलों तेव्हां त्यानीं समोरच्या भिंतीवर टांगलेल्या कॅलेंडराकडे बोट दाखविलें. तेव्हां तो रविवार होता हें लक्षांत येऊन मी सानंद खजील झालों. याच दिवशीं घरात चौदावें कन्यारत्न जन्मलें. बंद पडलेल्या घड्याळावरून घेतलेल्या जन्मवेळेची पत्रिका सर्व ज्योतिर्विदांचे मतें पुरुषाची ठरून मुलीचें लग्न होण्दास विलक्षण अडचण पडली. बरेच दिवस शोधांत राहिलों तेव्हा, अशीच एक चुकीच्या वेळेवर केलेली मुलाची पत्रिका मुलीची ठरून, चांगल्या पुनर्विवाहाच्या वयाला सखूचा विवाह उरकला.

(४) सांगून सवरून मी एखाद्या कृत्याला प्रवृत्त झाल्यानंतर त्याला तोंड देण्यासाठीं दुसऱ्याच्या तोंडाकडे पहाण्याचा प्रसंग आला तरी त्याचें मला दुःख वाटत नाहीं. दोन वर्षांपूर्वी तापश्रेष्ठ जो “ टायफॉईड ” त्यानें माझ्यावर स्वारी केली. त्या समयीं श्वासोश्वासाखेरीज सर्व हालचाली बंद ठेवण्याविषयीं डॉक्टरांनीं सक्त ताकीद दिल्यामुळें नेहमीच्या व्यवसायांत अगदींच खंड पडूं नये म्हणून

नर्सच्या तोंडाकडे पहाण्याचा प्रसंग येई. पुढें पुढें तीहि जेव्हां लिहिण्याला कंटाळून तोंड चुकवूं लागली तेव्हा तोंडापुरतें गोड बोलतांना क्विनाईनसारखा आवंडा गिळून काम करून घ्यावें लागे. टॉयफॉईडच्या बेचाळीस दिवसांच्या मुदतीपर्यंत माझ्यासारख्या तरुणाला अंथरुणावर पडून रहावें लागलें तर वाङ्मयाचें भयंकर नुकसान व्हावयाचें; शिवाय मी नुकत्याच सुरू केलेल्या मासिकाचा पहिलाच जोड अंक काढण्याची पाळी येऊं नये ह्मणून काय करावें अशा काळजींत होतों, तों टाइम, वर्क ॲन्ड स्पीड या गणितांतील विषयाची आठवण होऊन बेचाळीस दिवसांचा ताप, एका दिवसांत काढण्यासाटीं बेचाळीस डॉक्टरांची कमिटी आणि चार लघुरुद्राचें ब्राम्हण एकाच वेळीं बसवले. तापाच्या मुदतीच्या कायद्यापुढें कोणाचेंच शहाणपण चालत नाहींसें पाहून तापात संतापाची भर पडून तो इतका चढला कीं दोन्ही काखेंत दोन दोन थर्मामिटर्स लावलीं तेव्हा त्याचें प्रमाण पहातां आलें. प्रत्येक थर्मामिटरमध्यें पांच डिग्री मिळून वीस डिग्री चढलेला ताप डॉक्टरांचे कधींच पहाण्यात नसल्यामुळें घावरून जाऊन त्यांनींच डोळे पांढरे केले. तेव्हां नाकाडोळ्यांच्या वैदूला बोलावून आणून त्यांच्या डोळयात चागलें अंजन घातलें, तेव्हा ते शुद्धीवर आले. इकडे तापाच्या भरांत मी सारखा बडबडत होतों. नेहमींप्रमाणें मी कादंबरीचें प्रकरण लिहिण्यास सांगत आहें, असें वाटून नर्सनें तें सारे उतरून घेऊन रोजच्या वहिवाटीप्रमाणें तें प्रेसकडे पाटवून दिलें. बेचाळीसाव्या दिवशीं तें प्रकरण कादंबरींत छापून आलेलें पाहतांच

मी अगदीं थंड पडलों. औषधानें ताप उतरण्याची डॉक्टरांनीं आशाच सोडली होती. सुदैवानें सर्व प्रकरणांत तेंच प्रकरण सरस झाल्याबद्दल उल्लेखच दुसरे दिवशीं वर्तमानपत्रांतून वाचला आणि सद्गदित कंठानें मी नर्सचे आभार मानले. तरी-पण तेव्हांपासून दुसऱ्याकडून लिहून घेतेवेळीं मी तापांत बडबडत नाहीं अशी खात्री करून घेण्यास विसरत नाहीं.

( ५ ) लेखनाइतकेंच मला तपकीर ओढण्याचें भयंकर व्यसन आहे. डोक्यांत घुसलेल्या कल्पना शिंकेसरशी बाहेर काढण्यासहि तपकीरीचा फार उपयोग होतो हें माझ्या लक्षांत आल्यापासून तर लिहितेवेळीं तपकीर ओढण्याचा अतिरेक होऊन माझ्या लेखनव्यवसायामुळें तपकिरीचे व्यापाऱ्यांचा भलताच नफा झाल्यामुळें त्यांनीं मला मोठ्या सन्मानानें तपकिरीच्या डबींतून मानपत्र अर्पण करून माझ्या घ्राणेंद्रियाबद्दलचा आपला आदर व्यक्त केला. शिवाय तपकीर ओढण्यांत माझ्या लेखनाचा अमूल्य वेळ खर्च होऊं नये म्हणून तेवढ्यासाठीं व्यापारीमंडळानें आपल्या खर्चानें एक नोकर माझ्या दिमतीस ठेवण्याचा ठराव पास केल्याचें मला बरेच वर्षांनंतर समजलें.

(६) श्रुतिस्मृति पुराणासारखे असामान्य ग्रंथ आपल्या पूर्वजांनीं रानावनात लिहिले यावरून लेखनाला एकांताची किती गरज आहे हें सहज समजण्यास हरकत नाहीं. दर आठवड्याला नापिकाच्या आगमनानें सुद्धा एकांत भंग होऊं नये म्हणून त्यांनीं आपल्या दाढ्या, मिशा, जटा वाढतील तेवढ्या वाढूं दिल्या. वाङ्मयांत वायकांचा व्याप मोटा तापदायक वाटून

त्यांनीं स्त्रियांचें मुखावलोकन वर्ज केलें. योगाभ्यासानें लिहिण्याची समाधि साधली. आणि लेखनव्यवसायावर चरिर्थाताची सोय होईना म्हणून कंदमूळावर राहून अंगवस्त्रावांचून हजारों वर्षें कसेंबसें आयुष्य काढलें. आज आपल्या सत्तेचें असें रानवनहि राहिलेलें नाहीं. डोक्यावर जंगल वाढवणें असभ्यपणाचें ठरून गेल्यामुळें टिकठिकाणीं " केशवपन " संस्था स्थापन करण्यांत आल्या. संततिनियमनाचा प्रसार करण्याचा जोराचा प्रयत्न चालू असतांहि सृष्टिनियमाप्रमाणें व्हावयाचें तें चुकत नसल्यामुळें मुलाबाळाच्या पालनपोषणासाटीं पुरुषांना बायकांच्या तोंडाकडे पाहिल्याशिवाय गत्यंतरच उरलें नाहीं. योगाभ्यासापेक्षां इष्टीचा अभ्यासयोग पुरा होण्यापूर्वीच समाधिस्त होणारांची संख्या दिवसेंदिवस वाढूं लागली. तयार पदार्थांच्या उपहारगृहांतून कंदमुळें मिळत नसल्यामुळें " लिप्टनच्या " जीवावर जीव धरून रहाण्याचा प्रसंग प्राप्त झाला आहे. अशा सर्व प्रकारें बदललेल्या परिस्थितींत एकांताची अथवा स्वास्थ्याची आशा करणें म्हणजे निराशेला सामोरें जाण्यासारखेंच आहे. त्यांतल्या त्यांत पहावयाचें झालें तर वाचनालयांतून अद्यापहि थोडाफार एकात सापडण्याचा संभव असतो. लेखनासाटीं स्वतंत्र भाड्याची जागा घेणें धाडसाचें असून लेखनाचें कामहि कांहीं कमी धाडसाचें नाहीं. हीं दोन्हीं धाडसी कृत्यें एकट्याला झेपत नाहींत; म्हणून मी बहुधा लिहिण्याचें कार्य वाचनालयांत करतों. शिवाय तेथील ग्रंथसंपत्तीमुळें केवळ आपल्याच बुद्धिमत्तेवर विसंबून रहावें लागत नाहीं.

(७) शोकरसानें करुणरस उत्पन्न होण्याऐवजीं उलट वीररसच अनावर होऊन त्याचे दुष्परिणाम बालवयांत कसे भोगावे लागतात, याचा मला चांगला अनुभव आला असल्या-मुळें शोकाग्वातरमुद्धां शोकपर्यवसायी लिहावयाचें नाहीं अशी मी जवळ जवळ शपथच घेतल्यासारखी आहे. कादंबरींतील पात्रांनां वाचकांच्या मनरंजनार्थ दुर्धर प्रसंगांत लोटतांता माझ्या जिवावर येतें. परंतु त्यांत मी कोणाला दगाऊ न देता सर्वांच्या मनीषा पूर्ण करून शेवट शक्य तितका गोड करीत असतों. कादंबरीच्या एका प्रकरणात नाकाला वाघाचा भास होऊन एक गाढव मारलें गेल्याचें स्मरण कादंबरीचा समारोप करतेवेळीं मला अचानक झालें. तें तसेंच मरूं द्यावें तर गाढवाच्या संसाराच्या दृष्टीनें ट्रॅजिडीच होणार; बरं. मानवी उपायानें जिवंत करावें तर असंबद्धपणाचा दोष पदरीं येतो. शेवट या सामाजिक कादंबरींत प्रतिसृष्टी निर्माण करणाऱ्या विश्वामित्र ऋषींनां प्रगट करून त्यांच्या करवीं तें गाढव जिवंत केलें, तेव्हा माझ्या जिवांत जीव आला. माझ्या एका नाटकात नायकाचे वडील व नायिकेची आई हींच कायती शेवटीं विजोड अशीं एकटीं राहिलेलीं पात्रें पाहून मला भडभडून येऊं लागलें; अखेर त्यांचा पुनर्विवाह लावण्याची गोड कल्पना सुचल्यामुळें सामा-जिक सुधारणा हें नाटकाचें उच्च ध्येय ठरून त्याला भलतेंच महत्त्व प्राप्त झालें आणि त्यांचा अभावी होणारा शोकांत टळला!

(८) लिहिण्यापूर्वीं विचार करण्यात माझा किती काळ लोटत असेल हें माझें मला देखील सांगतां येण्यासारखें नाहीं.

" गाढवांचा गाढव " या नाटकाचें कल्पनाबीज मागील जन्मींच रुजत पडलेलें असलें पाहिजे असें विश्वेश्वरशास्त्र्यांनीं ज्योतिषशास्त्राच्या आधारें सिद्ध करून दाखवलें. माझा जन्म मेष आणि वृषभ राशीवर झाला असल्यामुळें या दोन्हीं राशींची छाया आज अस्पष्ट दिसत असली तरी ती ज्योतिषशास्त्राच्या चष्म्यातून स्वच्छ दिसूं शकते. शिवाय या जन्मीं नाहीं तरी मागील जन्मीं मी खास अन्य कोटींत जन्मलों असल्याबद्दलचा आधार भृगुसंहितेत सापडल्यामुळें तर माझी खात्रींच झाली यावरून वर्तमानकाळचा अपूर्ण विचार पुढील जन्मीं मूर्त स्वरूपात जन्मास येण्याचा संभव वाटतो. त्याच अद्भुत ग्रंथांत पुढील जन्मीं मला लोक देव समजून भजतील असाहि स्पष्ट उल्लेख सापडला. अर्थातच आज सोसावे लागणारे घाव पुढील देवकळेचे द्योतक असावे असे समजून मला कोणी दगड म्हणून म्हटले तरी ते मी मनावर घेत नाहीं. कारण पुढील जन्मीं हेच लोक माझ्या पायावर डोकें ठेवतील त्या वेळीं माझ्या पायानें त्याचें डोकें चेचण्याची सुसंधि मला भृगूच्या मतानें मिळणारच आहे. अशाप्रकारें माझ्या विचाराचे धागेदोरे मागील व पुढील जन्मापर्यंत पोंचत असले तरी " जात्यावर बसलें म्हणजे ओव्या सुचतात " या म्हणीची सत्यता पटण्याचा सुयोग एकदा मासिक अडचर्णींत अनायासेंच आला. भाकरीचें पीठ संपलें होतें. देशात कोणी तरी मोठा मनुष्य मेला असावा अशा संशयानें हरताळ पडून बाजार बंद होता. भाकरीवांचून गड्याचें चालण्यासारखें नसल्यामुळें, त्याच्यापुरतें पीठ स्वतःच दळल्यावांचून

इलाजच नव्हता. जात्यावर बसण्याची खोटी तों लहानपणीं मुलींच्या ऐकलेल्या ओव्या, इतकेंच नव्हे तर, श्रीधर कवीच्या कधीं न वाचलेल्या ओव्याहि भराभर आठवूं लागल्या. तेव्हां-पासून लिहिण्यास खुर्चीऐवजी जातेंच घेऊं लागल्यामुळें वाङ्मयाचें पीठ पाडण्यास विलंब लागत नाहीं.

( ९ ) मी स्वतः असा लिहावयास लागलों तों चांगला बिजवराच्या वयाला. यापूर्वीचें माझ्या नावावर प्रसिद्ध झालेलें सारें लिखाण माझी सुशिक्षित पत्नीच लिहीत असे हें प्रांजलपणें आता कबूल करण्यास मला मोठा अभिमान वाटतो. माझ्या शिक्षणाची उणीव पत्नीकडून भरून निघावी अशा उद्देशानें माझ्या परमपूज्य वडिलांनीं अत्यंत कुरूप परंतु सुशिक्षित मुलगी माझ्यासाठीं पसंत केली. परंतु त्यांच्या या दूरदृष्टीलाहि तिचें मरण दिसलें नसावें. नाहींतर तिचा विमा उतरून तिच्या पश्चात् माझ्या अन्नवस्त्राची सोय करून ठेवण्यास ते असे चुकते ना ! पत्नीच्या आकस्मिक निधनामुळें माझा अपमृत्यु मात्र टळला. कारण तिच्या कमालीच्या कुरूपपणाला कंटाळून जाऊन मी आपला जीव तिला अर्पण करून माझें तिच्यावरील प्रेम व्यक्त करणार होतों. असो. माझा लेखनव्यवसाय एकाएकीं बंद पडलेला पाहून मीच परलोकवासी झालों कीं काय अशा सम-जुतीनें माझ्या नांवावर परंतु परलोकच्या पत्यावर पत्रें येऊं लागली. वस्तुस्थिति काय आहे याची खात्री करून न घेतां वर्तमानपत्रांतून माझ्याविषयीं आलेले गौरवपर मृत्युलेख

मला जिवंतपणीं वाचावयास मिळाले. कांहीं परलोकविद्या-प्रविणांनीं तर मला प्लँन्चेटवर बोलवून माझी अद्भुत रम्य मुलाखत प्रसिद्ध केली; त्यांत हृदयाची क्रिया बंद पडून मी मेलों नसून दहन होईतों माझ्या काळजाची क्रिया चालूंच होती, परंतु श्वासोच्छ्वास थांबल्यामुळें मला मरावें लागलें " अशी माझ्या खोट्या मरणाची खरी हकिगत मी प्लँन्चेटच्या मुलाखतींत निवेदन केली होती. माझें वाङ्मय-स्मारक करण्यासाठीं फंडहि गोळा करण्याच्या विचारात वाङ्मयप्रेमी मंडळी होती, तोंच ही बातमी निराधार असल्याबद्दल छातीला हात लावून मी जेव्हां भर सभेंत ठांसून सांगितलें तेव्हा ही बातमी खोटी ठरून पुन्हां अभिनंदनपर संदेश व लेख येऊं लागून माझा आनंद द्विगुणित झाला. पत्नीनें दिलेल्या या सुसंधीबद्दल मी तिला धन्यवाद दिले जगाच्या रहाटीकडे अथवा उपवर वधूंकडे पाहून मी आपलें पत्नीवियोगाचें दुःख बाजूला टेवावें आणि वाङ्मय-संसार वाढवावा अशा आशयाचीं कळकळीचीं पत्रेंहि माझ्याकडे येऊं लागलीं. माझ्या लेखनव्यवसायांतील इंगित कोणालाहि माहित नव्हतें व लवकरच मी कांहीतरी लिहूं लागलों नाहीं, तर तें माहित होण्यास वेळहि लागणार नाहीं, या भीतीनें अधिक वेळ न गमावतां रात्रीच्या निवांत प्रहरीं बाराखड्यांची उजळणी करण्यास प्रारंभ केला. हां हां म्हणता त्यांत यश येऊन थोड्याच कालावधींत " सचित्र चित्र बोध " हें माझें स्वतःचे असें पहिलें पुस्तक प्रसिद्ध केलें. त्यांत पहिलेंच छायाचित्र पत्नीचें घालून तिच्या ऋणांतून अंशतः तरी मुक्त व्हावें या हेतूनें तिच्या

मुलाबाळांनां देखील उपयोगी पडणारा हा ग्रंथ तिला अर्पण करण्यांत मी आपला अप्रत्यक्ष रीतीनें प्राणच देऊन सती गेलों असें म्हणणें अतिशयोक्तीचें होणार नाहीं. या प्रकाशनांत पैशाची झालेली हानि भरून काढण्यासाठीं आज सतत बारा वर्षे लेखन-व्यवसाय सुरू ठेवावा लागला आहे.

( १० ) या ठिकाणीं माझ्या वडिलांचा अनुभव नमूद केल्यानें या प्रश्नावर चांगलाच प्रकाश पडण्यासारखा आहे. चरितार्थ चालवून जिवंत राहण्याचे सर्व उपाय खुंटल्यानंतर मरण्याला तरी काय उपाय योजावा या विचारात एक दिवस वडील होते. तों एका मासिकाचें एक मलपृष्ठ त्यांच्या हातीं लागलें. त्याच्या मागल्या बाजूस लेखकांस सूचना केल्या होत्या. त्यात लेखाबद्दल योग्य मोबदला देण्यात येईल असा मजकूर वाचून वडिलानीं आत्महत्येचा विचार रद्द करून त्या मासिकाकडे पत्रव्यवहार सुरू केला. दर पृष्ठाला एक रुपया देण्याची त्यांची वहिवाट असल्याचें कळताच, बाबानीं क्षणाचाही विलंब न लावता बाजारात जाऊन एक रीम उधारी खरेदी केलें. त्याचा विचार बरींच रीमें एकदम खरेदी करून जन्माचें दारिद्र्य काढून टाकावें असा होता. परंतु चालू दारिद्र्यच त्याला आड आलें. व्यापारी वाङ्मयभक्त नसल्यामुळें तो इतका माल उधार देण्यास तयार होईना. तेव्हां नाइलाज होऊन एका रिमाची चौपट पृष्ठें तयार केलीं. सरासरीनें या ग्रंथाचे पृष्ठीं एक रुपया या दरानें पांचशें रुपये तरी किमानपक्ष मोबदला

मिळून एक वर्षाची संसाराची बेगमी व्हावी असा अंदाज होता. आता लिहिण्याचीच काय ती खोटी होती. कोर्टांत नकला करण्यांत वडिलांचें बरेंच आयुष्य गेलें असल्याकारणानें एक रीम लिहिण्यास त्यांना फारशी अडचण पडणार होती अशांतला भाग नव्हता. परंतु श्रम होतील तितके कमी पडावे या हेतूनें कागदाच्या रीमाबरोबरच त्यांनीं कांहीं कारबन पेपर्सहि खरेदी केले. आणि मधून मधून त्यांचा उपयोग केल्यामुळें त्यांचे चांगले एक पूर्णांक एक चतुर्थांश श्रम वाचले. काय लिहावें या विचारांत काल दवडावा तर पांचशें रुपयांस येणाऱ्या व्याजाचें तेवढें नुकसान होतें म्हणून देवाचें नांव घेऊन त्यांनीं लिहिण्यास आरंभ केला आणि त्याच्याच कृपेनें तो शेवटास गेला. लगेच वडिलांनीं हस्तलिखित प्रत पांचशें रुपयाचें इन्शुअर करून पोस्टानें प्रकाशकाकडे रवाना करून मोबद-ल्याच्या मनिऑर्डरीची वाट पहात बसले. परंतु जबाबहि न आल्यामुळें सत्यनारायणाचा बेत रोज पुढें ढकलावा लागे. अखेर एक दिवस पुढील आशयाचें नॉटपेड पत्रप्रकाशकाकडून आलें. " आपल्या ग्रंथाला लागलेले कागद कोरे पाठवतां तर निदान सेकंड हॅन्ड रिमाच्या भावानें आमच्या प्रेसच्या खालावलेल्या स्थितींतहि खरेदी करण्याचें धाडस केलें असतें. कागदाबरोबर आपण आणखी खर्चीं घातलेली शाई सुटी होण्यासारखी नसल्या मुळें आमचा निरुपाय आहे. तरी आपलें हस्तलिखित परत करण्यासाठीं लागणारें पोस्टेज पाठवून द्यावें. " हा अनपेक्षित पाजीपणाचा जबाब वाचून वडिलांच्या पायाची आग मस्तकांत

जाऊन तिच्या ज्वाळा तोंडावाटें निघूं लागल्या. फायरब्रिगेडच्या टणटणाटाप्रमाणें ते ' विठ्या ' ' विठ्या ' म्हणून माझ्या नांवानें शंख करूं लागले. यापूर्वी मला विठ्या अशा नावांनें हांक न मारतां ते चांगले विठ्ठल विठ्ठल म्हणत असत. आमचा शेजारचा गवळी आपल्या रेड्याला कधीं कधीं लडिवाळपणानें विठ्या म्हणत असल्याचें मला माहित होतें. त्याच्याच लडि-वाळपणाला ऊत आला असेल असें समजून मी तिकडे लक्ष दिलें नाहीं. तों प्रत्यक्ष बाबाच आगीच्या बंबाच्या धावीप्रमाणें माझ्यावर चालून आले. शाळेंत जाण्याला उशीर झाल्यामुळें ते रागावले असतील असें समजून मी शाळेला बुटीस देण्याचा विचार रद्द करून टोपी व पाकिट घेऊन चालूं लागलों. तो " .........लेका कुठें चाललास ? " म्हणून त्यानीं सवाल टाकला आणि पुढें म्हणाले, " यापुढें आपल्या कुळांत कोणींहि लिहिण्यावाचण्यास शिकतां कामा नये. निदान तूं तरी आज-पासून शाळेंत पाय टाकशील तर याद राख. तुझ्या चरितार्थाची सोय म्हणून माझ्या मृत्युपत्रानें सदरहू ग्रंथ टपालहांशीलासह तुला दिला आहे. " असें तोंडीं मृत्युपत्र करून बाबांनीं प्राण सोडला. बाबांच्या पश्चात् मी सज्ञान झाल्यावर माझी वरील मिळकत माझ्या ताब्यांत आली, ती इतक्या जीर्ण स्थितींत कीं एकवेळचे कोळसे बचत करण्याचेंहि त्राण त्यांत राहिलेलें नव्हतें. परंतु त्याच दिवशीं माझ्याकडे पाहुणा म्हणून आलेल्या एका इतिहाससंशोधकास ती पुरातन बखर आहे अशी खात्री वाटून त्यांनीं ते हस्तलिखित सव्याज किंमतीला विकत घेतल्यामुळें

बाबांच्या इच्छेप्रमाणें माझी चरितार्थाची सोय लागली. असें असतां मी लेखनावर उदरनिर्वाह होउं शकत नाहीं असें कसे म्हणूं ?

( ११ ) स्फूर्तिशिवाय उच्च दर्जाचें लेखन होऊं शकत नाहीं याचा अनुभव मला अंकलिपीचें शुद्धीपत्र लिहितेवेळी चांगला आला. स्फूर्तीचे अभावीं तें लिहिलें गेल्यामुळें त्यांतहि इतक्या चुका राहून गेल्या, कीं, प्रथमावृत्ति रद्दीच्या भावानें विकावी लागली. त्यांतल्या त्यांत वार-टाईम असल्यामुळें रद्दी-लाच अधिक भाव येऊन पुस्तकविक्रींत व्यापाऱ्यास द्यावें लागणाऱ्या कमिशनची बचत झाल्यामुळें हिचें बाळंतपण पार पडलें.

(१२) टीकेचें तर मी इतकें महत्व समजतों कीं, प्रथम टीका व नंतर त्यावरील मूळ ग्रंथ लिहिले जाणें हा एकच निर्दोष-वाङ्मय-निर्मितीचा यशस्वी उपाय असें माझें प्रामाणिक मत आहे.



# नमुना—अंक

नवलपरिपूर्ण ! ]  अद्भुत  [ नवा अवतार ! !

॥ न भूतो न भविष्यति ॥

संपादकः—मंडळचतुष्पाद

**एकांआड निघणारें एकच पत्र**

पुरेसे वर्गणीदार मिळतांच पहिला अंक प्रसिद्ध होईल.

तरी

**आजच नांवें नोंदवा !**

**लेखकाच्या कानांतः**

गंभीर अगर भारदस्त स्वरूपाचें लिखाण स्वीकारलें जाणार नाहीं.

आजकालची हुच्चयाभिरुचि उद्दीपित करणाऱ्या मनोरंजक लेखाबद्दल सदैव ऋणी राहूं.

बेछूट व धाडसी लेखकांस शाई कागदाचा खर्च पुरविण्यांत येईल.

नापसंत लेख जाहिरातीच्या दुप्पट दरानें प्रसिद्ध करूं.

आलेले लेख वाचून पहाण्याच्या खडतर कामगिरीबद्दल एक रुपया फी ठेवण्यांत आली असून लेखाबरोबर ती न आल्यास असले लेख वाचले न जातां मृत समजण्यांत येतील !

   

## वर्गणीदारांच्या खिशांत

ज्ञानप्रसाराच्या उच्च हेतूनें हें साहस करतांना छातीचा कोट करावा लागत असून या कोटाच्या पोटावर येणाऱ्या खिशांत वर्षाकाठीं सारे साडेतीन रुपये टाकण्यांत ग्राहकाच्या खिशाचे टांके ढिले होतील असेंच केवळ म्हणतां येत नाहीं. सरासरीनें प्रत्येकीं दरसाल दरशेंकडा या प्रमाणात निघणारा सिगारेटचा धूर लक्षांत घेतला म्हणजे या आगींत किती नियतकालिकें खाक होत असतील हें समजण्यासारखें आहे ! दर ताशीं तंबाखूचा तोबरा भरणाऱ्या पट्टीच्या पानबाजाला सालीना साडेतीन रुपड्या वर्गणी भरण्यांत काय कात वाटणार ? लिफ्टनच्या साहित्यापुढें, नुसत्या साहित्याची चहा कितीशी होणार ? सारांश वाङ्मयाची किंमत सोडून दिली तरी निव्वळ रद्दी कागदाचा उपयोग पोराबाळांच्या संसारात कोणकोणत्या प्रकारें होऊं शकतो हें लक्षांत घेऊन बारा वर्षांची वर्गणी एकदमानें भरणारास तहहयात ग्राहक करून टपाल हंशील देखील माफ असल्यामुळें अधिक विचार करण्यांत हंशील नाहीं. मनिऑर्डरीचा फार्म नमुना अंकाला जोडला आहे तो वर्गणीसह भरून पाठविण्याची त्वरा करून पहिल्या अंकाची वाट पहात बसा !

## जाहिरातदारांच्या दारांत

वाङ्मय—प्रसार अथवा अभिवृद्धीबद्दल कोणी कशाहि उत्तेजक गप्पा मारोत, किंवा यात्र गप्पा प्रतिष्ठितपणें ठोकतां

याव्या, म्हणून हजारों रुपयांचा फडशा पाडून कितीहि साहित्यसंमेलनें भरोत; परंतु ठराविक ठशाच्या गप्पा ठरावांच्या ठसठशीत स्वरूपांत पसार करून सभासद घरोघरीं पसार झाल्यानंतर या वाङ्मययशाची फलश्रुति कितीशी पदरांत पडते हे विद्वानांवांचून कोण सांगूं शकणार ?

वाङ्मय कशाशीं खातात हें कदाचित जाहिरातदारांस माहितही नसेल; परंतु त्यांच्या अभावीं दैनिकांची दैन्यावस्था, साप्ताहिकांची सप्तासमाप्ति, आणि नियतकालिकांची मयतकालिकें झाल्यावांचून राहिलीं नसतीं हें कोणालाहि सांगतां येण्यासारखें आहे.

रामबाण औषधांचा गुणप्रभाव दशमुखानें वर्णन करणाऱ्या जाहिराती वाङ्मयांत मोडल्या जाणार नाहींत अथवा त्यातील औषधें रामबाण असल्याची खात्री दशमुखावांचून कोणी देऊं शकणार नाहीं, तथापि वृत्तपत्री वाङ्मय त्यांवाचून जिवंत राहूं शकणें दुरापास्त आहे हें साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षांना एकमुखानें कबूल करावें लागेल.

" अतंकनिग्रह " गोळ्यांचें सामर्थ्य परिषदेंतून पसार होणाऱ्या निग्रही ठरावांच्या अनंत गोळ्यांहून अधिक नसेल; परंतु आज कित्येक वर्षे त्यांचा वाङ्मय वृद्धीकडे होणारा उपयोग दृष्टिआड करतां येण्यासारखा नाहीं.

अश्लीलतेचा कीस काढणारे नीतिमान " कोकशास्त्राची " जाहिरात दृष्टिआड करीत असले तर त्यांची न्यायदृष्टि कृतघ्न म्हणावी लागेल !

वाङ्मयक्षेत्रांत जन्मास येणाऱ्या आबालवृद्ध वृत्तपत्रांचें बाळसें डोंगरे यांच्या " बालामृतावरच " अवलंबून नाहीं काय?

मसालेवाले बेडेकर कदाचित साहित्यसभेचे अध्यक्ष होऊं शकणार नाहींत; परंतु साहित्याला आवश्यक तो द्रव्याचा 'मसाला' ते अंशतः पुरवीत आहेत यांत शंका नाहीं. आणि " त्रिकाळदर्शी " आरशातही असेंच दिसून येईल !

सारांश जाहिरातदारांची थोरवी लक्षांत घेऊन कृतज्ञता-बुद्धीनें आमचे फिरते एजण्ट दारोदार जाऊन जाहिरातींचे दर उभयतां सलोख्यानें ठरवतील.

   

## हंसावें कीं रडावें

प्रणयभंगानें एका सुशिक्षित तरुणाच्या काळजाचें पाणी होऊन त्यांतच बुडून तो मरण पावला !

" पाण्यांत जीव सोडून, जिवावर पाणी सोडूं इच्छिणाऱ्या तरुणांनीं हा उपाय करून पहावा ! "

  

म्याट्रिकच्या परीक्षेत उत्तीर्ण न झाल्यामुळें एका अल्पवयी विद्यार्थ्यानें शाळेच्या इमारतीच्या शेवटल्या मजल्यावरून उडी टाकून जीव दिला !

" Not low ambition, but failure is crime" असेंच म्हटलें पाहिजे.

  

नोकरीबाबद निराश झालेला पदवीधर उपासमारीनें मृत्युवश झाला !

" शिक्षणाची महती याहून अधिक ती काय असावयाची ?

  

नुकत्याच झालेल्या मोटारच्या अपघातांत चार माणसें जागच्या जागीं ठार होऊन मोटारला मात्र यत्किंचितही दुखापत झाली नाहीं !

" हा अपघात मोटार गॅरेजमध्येंच झाला असावा ! "

  

बकालभाई मोहल्यांतील एका इमारतीला आग लागून ती खाक झाली ! भाडोत्री कोणीच नसल्यामुळें जीवहानि अथवा इतर नुकसान झालें नाहीं. इमारत इन्शुअर केलेली आहे. आगीचें कारण कळत नाहीं !

" विस्तव हेंच आगीचें कारण असलें पाहिजे आणि भाडोत्री न मिळाल्यानें मालकाच्या अंगाची आग घरापर्यंत भडकली असावी. "

  

रावबहादुरांच्या वाढदिवसानिमित्त झालेल्या गार्डनपार्टींत एकाएकीं गाढव घुसून एकच गोंधळ माजला !

" गाढव ओळखून काढणेंहि मुष्किलीचें झालें असावें !"

  

डॉ. अमृते एकाएकीं मरण पावले ! मृत्यूचें कारण कळत नाहीं !

"हृदयाची क्रिया बंद पडण्यावांचून दुसरें काय असणार !"

  

उच्च शिक्षणासाठीं परदेशांत गेलेल्या चिरंजिवांना तिकडेच पुत्ररत्न झाल्याची बातमी ऐकून त्यांच्या वृध्द मातोश्री नातू पहावयास जिवंत राहूं शकल्या नाहींत !

" हर ! हर ! बिचारीला " सुनमुख " देखील पहावयास मिळूं नये ना ! "

  

कॉलेजशिक्षणानें सज्ञान झालेली कुमारिका नाहींशी झाली असून अद्याप पत्ता लागला नाहीं !

" ती खास " केअर ऑफ " ( C/o ) आहे असें समजून काळजी करण्याचें कारण नाहीं ! "

## कुडाच्या तुंबड्या

जगांतील कापूस एकत्रित करून त्याचें सूत कातलें तर तें स्वर्गाला जाण्याला पुरेसें होईल असें एका आंकडे पंडिताचें अनुमान आहे !

  

सरासरीनें साठी पावेतों जगणारा मनुष्य आपल्या आयुर्मर्यादेंत पोहोतां येईल इतकें पाणी निरनिराळ्या प्रकारें शरीरद्वारा बाहेर टाकतो असें एका शास्त्रज्ञाचें म्हणणें आहे !

  

सर्व देशांतील वृत्तपत्रांची होळी केली तर तिचा प्रकाश एक शतांश सेकंड फाल्गुनी पौर्णिमेइतका पडावा असा एका कल्पकाचा अंदाज धावतो !

  

सालिना व्यसनापायीं उडविण्यांत येणाऱ्या दारुबाजीच्या खर्चांत, एक आठवडा सतत उडत राहील असें सार्वत्रिक प्रेक्षणीय दारुकाम उडवितां येईल असें एक तर्कज्ञ म्हणतात !

  

एका इतिहाससंशोधकाला नुकत्याच सांपडलेल्या जुन्या कागदपत्रावरून शिवाजीचा जन्मकाळ अफझुलखानाच्या वधानंतरचा असला पाहिजे असें सिद्ध होतें ! मावळे लोक अफझुलखानवधाचें नाटक करीत त्यांत स्वतः शिवाजी अफझुलखानाची भूमिका घेत असा पुरावा सांपडतो !

विख्यात भूगर्भ शास्त्रज्ञाचें असें मत आहे कीं सूर्योदयाबरोबर चारी दिशेनें हवा कुंठित करतां आल्यास तिच्या दाबानें पृथ्वीचा चुराडा होईतों बारा वाजतील !

## वर्तमानकाळचें भविष्यभूत

( वर्तविणार—ज्योतिर्मार्तंड-अ. प. शकुनी )

**मेष:**—महिना कसा जाईल याचा नियम नाहीं ! राशीचक्राचा आरंभ मेषेपासून होत असल्यामुळें चक्रांत सांपडल्यासारखें होईल ! महिनाअखेर स्त्रीसुखांत व्यत्यय ! खाटिक—धंद्यास किफायतशीर.

**वृषभः**—चालू मास केव्हा गेला तें समजणार नाहीं! स्त्रीसौख्याला सर्वोत्कृष्ट. तितकाच प्रकृतीला अनिष्ट. शेतीला उपयुक्त.

**मिथुनः**—या महिन्याचे दिवस जातां जाणार नाहींत! राशीच्या गुणपरत्वें जुळया गर्भांचा संभव असून नसते संबंध जुळून येतील. व्दिदळ धान्य वर्ज करावें.

**कर्कः**—हा काल केव्हां संपतो असें होईल. ही जलरास पाण्याचा अपघात दर्शविते! पाण्यासारखा खर्च होउन अखेर डोळयां वाटे निघेल. शत्रु पाण्यांत पहातील. पाण्याऐवजीं भस्मस्नान करणें श्रेयस्कर आहे!

**सिंहः**—हा महिना खायला आल्यासारखा वाटेल! गतकालाचें सिंहावलोकनही करूं नये! शिकारी व सर्कस-वाल्यांनी सावध रहावें.

**कन्याः**—दुष्काळांत तेरावा महिना आल्याप्रमाणें जाणवेल! कन्यादानावांचून ही साडेसाती दूर होण्यासारखी नाहीं!

**तूळः**—तुलनात्मक दृष्टीनें प्रथम अनुकूल वाटलें तरी शेवट तराजूचें पारडें फिरल्यावांचून रहाणार नाहीं! काटेतोल असावें.

**वृश्चिकः**—गेला तो काल बरा असें होईल!! या राशीचा संबंध मृत्यूशीं येत असल्यामुळें अखेरच्या तेरा दिवसांच्या आंत मृत्युपत्र करून टेवणें जरूर दिसतें!

**कुंभः**—हा महिना राशीस लागल्यासारखा वाटेल! घटस्फोट होण्याचा संभव आहे! मृत्तिकापात्रें तरी फुटल्यावांचून रहाणार नाहींत! कुंभारांस उत्कर्षकारक.

**धनः**—हा महिना दिसूं शकला तर संततिसुख पहावयास मिळेल ! नवव्या महिन्याची द्योतक ही रास असल्यानें स्त्रीसुखाला प्रतिकूल जाईल. नर्सेस व सुइणीला लाभदायक.

**मकरः**—सुखावर संक्रांत यावी अशा प्रकारचे दिवस जातील ! गोड बोलून कार्यभाग साधल्यास पहावा. तिळांच्या व्यापाऱ्यास व साखरेच्या धंद्यास लाभदादक.

**मीनः**—ही रास बाराव्या मासाची निदर्शक असल्यामुळें बारामासे म्हणजे तोळा या प्रमाणांत चालू मास मांसवृद्धिकारक असला तरी पहिल्याच पंधरवड्यांत शंख म्हणण्याची पाळी येईल.

॥ शुभं भवतु ॥

## ग्रंथप्रसूतीचा—बाळंत विडा

**पाकळ्याः**—काव्यकेतूंच्या अप्रकाशित व अखिल दहा कवितांचा हा संग्रह त्यांच्या वाढदिवसानिमित्त नुकताच प्रसिद्ध झाला आहे. यांतील पाकळ्या काव्यसुगंधाभावी काव्यवृक्षाला पाकोळ्याप्रमाणें लोंबकळलेल्या दिसून येत असल्या तरी त्यांतील विशेष हाच कीं त्या गद्यापेक्षाहि साध्या असल्यामुळें वाटेल त्या चालीवर बाराखडी परवाच्याप्रमाणे घडघडीत म्हणता येतात. पाकळ्यांची किंमत निर्माल्यवत् म्हणण्याइतकी अल्प ठेवली आहे !

**उल्हासः**—दर पौर्णिमेला प्रकाशित होणाऱ्या या पाक्षि-काचा फाल्गुनि पौर्णिमेचा खास अंक मासानुकूल विविध

विषयांनीं सचित्र सजविला असून त्याच्या उद्दीपक चित्ताकर्षत्वा-मुळें एखादा महान् नीतिभक्तही या अंकाकडे ओझरती संभावित नजर टाकल्यावाचून रहाणार नाहीं अशी आमची खात्री आहे.

**विठ्ठलसिद्धिः**—अलिकडे रंगभूमीवर पंढरीची कृपादृष्टि पाहून संत सखूचें आख्यान निराळ्या नावानें अवतीर्ण होत आहे. नाटककाराची या पुढील कृति मागलीच बरी म्हणावयास लावील तर न कळे !

**निशाचरः**—अपरात्रीच्या पत्राची तीव्रतेनें इतके दिवस भासत असलेली उणीव या नवीन निघणाऱ्या "निशाचरानें" भरून काढली यांत शंका नाहीं ! यात रात्रीचा भूतसंचार, सकाळचें भविष्य आणि वर्तमानकाळाची ताजी बातमी या त्रिकालज्ञानाखेरीज रेलवेचें वेळापत्रक, दैनिक पंचाग शुद्धि, खान, पान गमनादि कार्यास शुभाशुभवेळा, तेजी मंदि वगैरे नित्य व नैमित्तिक माहिती येत असल्यामुळें रात्रीं बे रात्रीं "निशाचर" मार्गदर्शक होईल !

**लघुत्तम कथाः**—ले. चिंतामण चतुर्भुज चिंचोके

## चिंचेचें झाड

ती चांदणी रात्र असली पाहिजे यात शंका नाहीं ! अंधाऱ्या रात्रीचा भीषण किर्रव हृदयभेदक किंकाळी, व घोड्याच्या भरधाव टापांचा आवाज ऐकू येत नव्हता यावरून कथानककाल ऐतिहासिक नसून ताजा सामाजिक असावा हें उघडच होय.

अशा कांहींशा अवेळीं अथवा ठरलेल्या वेळीं मधुकरासारखा तरुणबांड, आड वाटेला किंवा संकेतस्थलीं एका चिंचवृक्षाच्या छायेंत उभा राहून शून्य दृष्टीनें पहात होता. त्या अर्थी त्याला प्रेमपिशाच्चानें पछाडलें असावें यांत शंका नाहीं. प्रणयवणव्यांत काष्टवत झालेल्या त्याचा तारुण्यतरु पाणिग्रहणासाठीं अधिकच व्याकूळ व्हावा हें स्वभाविकच होय !

दर्शनोत्पन्न तत्कालिक प्रेमाच्या चटक्यानें तो किती होर-पळत असावा हें त्याच्या दीर्घ निःश्वासावरून समजण्यासारखें होतें ! हृदयाकाशस्थ चंद्रिकडे वेधलेल्या मधुकराच्या प्रेमांध दृष्टीला अंधःकारमय भासणाऱ्या बाह्य चंद्रप्रकाशांत आशेचा किरण दृग्गोचर होत नाहींसा पाहून मधुकराची स्थिति अधिका-धिक शोचनीय होत चालली. प्रणयिनीच्या प्रथम दर्शनामुळें जें चिंचेचें झाड मधुकराला कल्पवृक्षाप्रमाणें वाटत होतें तेंच आतां कल्पांतकारक वाटूं लागलें ! प्रेमदेवतेवर एखादें अकास्मिक व अपरिहार्य संकट तर आलें नसेल ना असें मनांत येऊन मधुकर विषण्ण दृष्टीनें प्रणयनीच्या निवासस्थानाकडे पहात असतां अर्धवट उघड्या असलेल्या गवाक्षांतून काकस्वर त्याच्या कानीं आला ! भलत्या वेळीं कावळ्याचा आवाज ऐकून आपण भ्रमांत अगर स्वप्नांत तर नाहींना असें त्याला क्षणभर वाटल्यावाचून राहिलें नाहीं ! इतक्यांत चिंचेच्या झाडाकडे काव काव करीत उडत येणारा कावळा मधुकराच्या पिंड देहाला स्पर्श करून दिसेनासा झाला ! या चमत्कारानें स्तिमित

झालेल्या मधुकराच्या बुद्धींत निमिषार्धात विलक्षण प्रकाश पडून त्याचा पांढरा फटफटित चेहरा आरक्त दिसूं लागला! काव्य कल्पना उत्तेजित होऊन कावळा व काव हें कोडें सुटतांच मधुकराला 'मेघदूताचें' महत्त्व वाटेनासें झालें! वसंतागमनानें नवऋतु प्राप्त झालेल्या वनश्रीच्या उन्मत्त सौंदर्याकडे तो अर्थपूर्ण दृष्टीनें पहात असतां नभोमंडळांतून एक तारा खळकन तुटून मधुकराच्या ललाटींच आदळल्यामुळें तो मूर्च्छित झाला! थोड्या वेळानें अर्धवट शुद्धीवर येतो न येतो तोंच त्याच्या कानीं निरनिराळे आवाज येऊं लागले. चाई गरम; शेव-भज्या, पान-पट्टी, हमाल ही ओरड ऐकून तो अधिकच भांबाऊन गेला! इतक्यांत त्याच्या डोळ्यापुढें "चिंचवड" हीं अक्षरें स्पष्ट दिसतांच मधुकर "आ" पसरून स्टेशनकडे पहातच राहिला!

**टीप**—या गोष्टींतील मध्यवर्ती कल्पनेची भरारी एका सुप्रसिद्ध लघुकथालेखकाच्या गोष्टीवरून सुचलेली असल्यामुळें ती कोणालाहि आक्षेपार्ह वाटण्याचें कारण नाहीं!

**चिं. च. चिंचोके**

## शालजोडींतला नजराणा

प्रिय संपादक महाशय,

आपण संपादकीय सर्वज्ञतेचें कातडें पांघरलें असलें तरी दुगाण्या झाडण्याची मूळ वृत्ति जातिवंत स्वरूप प्रगट केल्या-वांचून कशी राहील! लहाना तोंडीं मोठा घास घेऊन पोट

भरण्यांत आपणास कितीहि धन्यता वाटत असली तरी छापखान्यातील सामान्य कंपॉझिटर देखील जरूर तर एखादा कामापुरता मामा जवळ करून हें वैभव मिरविण्यास समर्थ होणार नाहीं काय ? संगीत विषयांत " सवै मुक्तोथवा पशुः " या कोटींतील जीव जर संगीतपरिषदेच्या अध्यक्षपदाचा मान, न राखतां संपादन करूं शकतो तर संपादकत्व हा तर कोणाचाहि जन्मसिद्ध हक्क होय असें म्हणावयास काय प्रत्यवाय आहे ? पाश्चिमात्यांच्या " कमोड " आसनाप्रमाणें अध्यक्ष व संपादकीय खुर्चीला आपपरभाव कुठें आहे ? अध्यक्षांचें भाषणविसर्जन कितीहि किळसवाणें झालें तरी ज्या प्रमाणें ती खुर्ची त्यांना ढकलून देत नाहीं त्याचप्रमाणें संपादकीय खुर्चीला कसलाच किळस वाटत नाहीं ! " मूकं करोति वाचालं " अशा प्रकारच्या सामर्थ्यवान व्याख्यानमालांनीं, वक्तृत्वाचा बळी देण्यासाठींच कीं काय निर्माण केलेले संगीत वक्ते उद्यां राष्ट्रीय सभेचेहि अध्यक्ष होणार नाहींत कशावरून ? तसेंच वाटेल तें करण्यास एका पायावर तयार असलेला संपादक साडेतीन हाताच्या खोलींत बसून " पंगूं लंघयते गिरिम् " या न्यायानें देशाटन, पंडितमैत्री व सभेंत संचार करून सर्वज्ञ होण्यास त्याला शास्त्रग्रंथ विलोकन करण्याचें कारण पडत नसावें !

लेखकांना देण्यांत येणाऱ्या मोबदल्याच्या प्रॉमिसरी नोटला गव्हर्नमेंट सिक्युरिटी नसतांहि संपादकाच्या प्रॉमिस टू पे वर वाटेल तितके लेख ऑन डिमान्ड पुरविले जातात; ते

छापण्याचें काम कंपाझिटरच करीत असतो. वाङ्मयप्रूफ संपादकाला प्रिन्टर डेव्हिलच्चीं प्रुफेंहि तपासावीं लागत नाहींत. सारांश वाचकाच्या उदाराश्रयावर स्वतः मिरविण्यास अंगीं कोणती विद्वत्ता असावी लागतेच असें नाहीं. " सर्वे गुणाः काचनमाश्रयंते " या न्यायानें ज्याप्रमाणें गर्भश्रीमंती वाटेल तो गुण प्रसवूं शकते त्याचप्रमाणें संपादक हा पुढें मागें, पुढारी, दशसहस्रेषु वक्ता, नामांकित नाटककार समजला गेल्याविना रहात नाहीं ! हें वैभव स्पृहणीय तर खरेंच; परंतु वर सांगितल्या-प्रमाणें तें एखादा कंपॉझिटर देखील मिरवूं शकणार नाहीं काय ? त्याला काय शिवीगाळी करतां येणार नाहीं, का कुचाळी काढण्यास मनाई आहे, का श्वानवत् गुरगुरण्याइतकी त्याच्यांत कुवत नसेल ?

दुसऱ्याची उडविण्यास स्वतःला डोकें नसलें म्हणून काय झालें ? पुढाऱ्यांची वाटेल तशी धिंड काढण्यास अकलेच्या बाज्याखेरीज अधिक तें काय लागतें ? शाब्दिक आहेरास सडक्या शेलापागोट्यांची तरी काय गरज ?

साराश संपादकत्व हें एक असें काहीं मोठें ऐश्वर्य नाहीं कीं त्यानें डोळे फिरून जावे ! लोकाश्रयावर स्वतःचा जीव अवलंबून आहे याचें भान नसावें ! किंवा दुसऱ्याची योग्यता न जाणतां आपली लायकीहि कळूं नये !

नाटकांतील सामान्य नट आणि अर्ध्या हळकुंडानें पिवळे होणारे संपादक यांचें वैभव सारख्याच प्रकारचें नाहीं काय ?

नट राजाहि होऊं शकतो, परंतु नाटक संपताच तो पदच्युत होऊन त्याला वाढण्याचें कामही करावें लागत नसेल असें नाहीं. आणि हें नोकरीचें भाग्यही नष्ट होण्याचा प्रसंग आल्यास हे राजनट कोणत्या स्थितींत कोठें दिसतील हें कोणी सांगावें ? अशाच प्रकारें सामान्य संपादकाचें परिवर्तन होण्याचा संभव व अनुभवही येत नाहीं असें नाहीं. तरी या नाटकी वैभवानें भडकून न जातां संपादकीय दर्जा वृद्धिंगत करा हीच प्रेमाची सूचना.

आपलाच

चर्मज्ञ

## सिनेमा-संदेश

### " स्वर्गीय सिनेटोन "

प्रतिसृष्टि निर्माण करणाऱ्या विश्वामित्र ऋषींची नुकतीच प्लॅन्चेटवर मुलाखत घेण्यात आली, ती वाचकांखेरीज कोणासही कळवूं नये अशी त्यांची सक्त ताकीद आहे.

ऋषिवर्य तूर्त सिनेमासृष्टीच्या बोलपटांत गुंतले असून त्यांना बोलालाहि फुरसत नसल्यामुळें मुलाखत देतच नव्हते, परंतु प्लॅन्चेटपुढें त्यांचा नाइलाज झाला !

मुलाखतीचा सारांश असा कीं, दिवसेंदिवस भक्ति भाव नष्ट होत चालल्यामुळें अन्नपोटादि पूजा महा नैवेद्य दुर्मिळ होऊन देवादिकांची अन्नान्नस्थिति झाली आहे. क्षीरसागर

होता म्हणून इतके दिवस तरी निभावले; परंतु तोहि आतां कोरडा ठणठणीत पडला असल्यामुळें कांहीं तरी उद्योगधंदा काढल्या-वांचून देवांचीहि धडगत उरलेली नाहीं, असें पाहून ऋषिवर्यांनीं भगीरथ प्रयत्नानें कुबेराच्या भांडवलावर " स्वर्गीय सिनेटोन " नांवाची प्रायव्हेट लिमिटेड कंपनी स्थापन केली आहे.

भगवानांच्या मालकीचा कोरडा पडलेला क्षीरसागर या देवोपयुक्त कार्यासाठीं शंभर वर्षांच्या ' लीज 'नें ते देण्यास तयार झाले असून त्या विस्तीर्ण क्षेत्रांत भव्य स्टुडिओ उभारण्याचें काम सहस्रनेत्रांच्या देखरेखीखालीं रात्रंदिवस नेटानें चालू आहे !

गेल्या नारळी पौर्णिमेला मुहूर्ताचा नारळ फोडून रात्रीं चांदण्यांत संगीत सत्यनारायण नारायणांच्या शेषासनावर साजरा झाला ! या प्रसंगीं झाडून सर्व देव उपस्थित झाल्यामुळें प्रसादही खुटल्यावांचून राहिला नाहीं ! भगवानाच्या क्षीरसागरा-पासून तो शंकरजींच्या स्मशानापर्यंतच्या क्षेत्रांत मुंगी शिरण्यास वाव नव्हता ! देवांचा हा अपूर्व उत्साह पाहून समारंभांत सहसा सामील न होणारे भोलानाथ देखील आल्यावांचून राहिले नाहींत. इतकेंच नाहीं तर विशेष म्हणजे सत्यनारायणाची कथा त्यांनीं आपण होऊन सांगितली ! मग काय विचारता ? आधींच उल्हास आणि त्यांत फाल्गुन मास असें होऊन कथा समाप्त होई तों खुद्द नारायणाची एक झोंप पुरी झाली, मग इतरांची काय कथा ? अस्तु.

" स्वर्गीय सिनेटोनचा " " मेनका " हा पहिला बोलपट विश्वामित्र डायरेक्ट करणार असून म्युझिक डायरेक्टर गंधर्व

व आर्ट डायरेक्टर विश्वकर्मे आहेत ! एकाच वेळीं तीन क्यामेरे उपयोगांत आणतां यावे म्हणून क्यामेरामनचें काम त्रिमूर्तींकडे सोंपविलें आहे ! जन्म मरणाचें रेकॉर्ड स्पेशालिस्ट यमधर्म रेकॉर्डींगचें कामास लायकच होत ! तिन्हीं लोकीं संचार करणाऱ्या नारदमुनींकडे ॲडव्हर्टायझिंग डिपार्टमेन्ट सोंपविल्यामुळें कलागती लावून कंपनींत फाटाफूट करण्यास त्यांना संधी व सवड मिळण्याचा संभव नाहीं !

कथानक तयारच असल्यामुळें सिनेरिओचा एक एक " पीस " सरस्वतीदेवी मोराच्या पिसावर लिहून पुरा करीत आहे ! आंग्ल भाषेंतही या चित्रपटाची एक प्रत तयार करावयाची असून त्या भाषेचा अभ्यास करण्यास सवड अशी काय ती नंदीला असल्यामुळें त्यांनीं भाषांतर पाठमालेचें पहिलें पुस्तक संपवून पूर्णपूर्णभूत काळापर्यंत दुसरें पुस्तक ओढीत आणलें आहे !

स्त्रियांच्या भूमिका स्त्रियांनीं कराव्या किंवा नाहीं हा प्रश्न देवलोकींहि उपस्थित झाला असून त्याचा निर्णय लागणें शक्य नसल्यामुळें " मेनकेची " भूमिका साक्षात् भगवान् घेणार आहेत ! स्त्रीपार्ट तें किती बेमालूम उठवतात याचा अनुभव मोहिनीस्वरूपीं नारायणानें भस्मासुराचेंहि भस्म करून दाखविलें असल्यामुळें त्यांची मेनकेची भूमिका नितांत सुंदर होईल हें सांगावयास नकोच ! मूळ कथानकांत योग्य फेरफार देखील थोडाफार सुध्दां करावयाचा नसल्यामुळें मेनकेच्या पहिल्या वस्त्रविहीन एन्ट्रीपुरती भगवानांच्या ऐवजीं पुतळयाची योजना केली आहे !

खुद्द ऋषिवर्य डायरेक्टर झाल्यामुळें, विश्वामित्राची भूमिका भोलानाथ दिगंबर घेणार आहेत ! स्वयंभू दाढी, मिशा जटांच्या थाटानें हें पात्र दणदणीत दिसेल यांत शंका नाहीं ! त्यांचें स्मशानताडव संगीत ध्वनिलेखन यंत्राला झेंपण्यासारखें नसल्यामुळें चित्रपट भूमीला अनुकूल अशी कवाली गजल सारखी नाजुक गायकीची तामील दिगंबरांना तुंबर देत आहेत ! गाण्याची तंद्री लागण्यास भांगेचा मारा पोषक होऊन आवाजी खुलत चालली आहे ! मेनकेच्या अपूर्व लावण्यापुढें विश्वामित्रा-सारख्यांचें तपोनिष्ठ ब्रह्मचर्यव्रत टिकूं न शकल्यामुळें जात्याच स्त्रीलंपट पार्वतिपतींची बोलपट पुरा होईतों कितपट लटपट होते इतकीच काळजी आहे ! त्यांत आणखी बोलपटांतील " मेनका " वस्तुतः स्त्री नसून आदिपुरुषच आहे. ही शुध्द भांगेच्या भरांत राहील कीं नाहीं ही पण शंकाच ! तेवढ्यासाटीं योगसाधन चालविलें आहे. परंतु योगायोगापुढें कोणाचें काय चालणार ? संततिनियमनाप्रमाणें तेही फोल होणार नाहीं म्हणून कशावरून ?

या बोलपटांच्या निमित्यानें आदिमायेची कुचाळी काढण्यास पार्वतीदेवीला चांगलेंच फावलें ! " तुझा नवरा माझ्या नवऱ्याची बायको होणार " असा कोटें पार्वतीदेवीनें टोमणा मारतांच आकाशपाताळ एक होण्याची वेळ आली ! दोघींचा हा पूर्वापार चालू असलेला झगडा अधिकच विकोपास जाऊन कंपनीचीच धडगत दिसेनाशी झाली होती ! परंतु

अखेर नारदाची शेंडी ऋषिवर्यांच्या हातीं रहाण्याऐवजीं उलट त्यांना नारदमुनीच्या दाढेखालीं हात घालावा लागला तेव्हां सर्वत्र स्थीरस्थावर झालें !

बोलपट पुरा होईतों लक्ष्मी पार्वती वगैरे स्त्री वर्गाला माहेरीं पोंचविण्यांत आलें आहे.

नटांना येण्याजाण्यासाठीं पुष्पक विमानाची लॉरी केली असून गरुडाच्या पक्षपातानें ती चालू होते आणि ब्रेकसाठीं नंदीला मागें जोडण्याची योजना केली आहे !

टॉकी सेट खरेदी करण्यासाठीं लंबोदराची स्वारी उंदरावर बसून जर्मनीला जाण्यास निघाली आहे ! बरोबर ऋद्धिसिद्धींची जोडी असल्यामुळें परदेशीय स्त्रियांच्या वातावरणाबाबद गज-कर्णाची काळजी बाळगण्याचें कारण नाहीं ! प्रवासांत विघ्नहर्त्यांना इतर अपरिहार्य विघ्नें न आल्यास ते गणेशचतुर्थीच्या सुमारास परत येतील अशी आशा आहे !

## आतां थोडे रडूं या

अगत्याची सूचनाः—

खालील निधन-वृत्त वाचतांना “ **कळविण्यास अत्यंत दुःख होतें कीं** ” असा आरंभ करून “ **मृताच्या आत्म्यास शांति मिळो** ” या वाक्यानें सद्गदित स्वरांत शेवट करावा ! मयतांची छायाचित्रें उपलब्ध नाहींत याबद्दल अधिकच दुःख होतें ! परलोकविद्येच्या साधनानें मृतात्म्यांचे फोटो संपादन

करण्याचा प्रयत्न चालू असून अशा प्रकारची शंभर छाया चित्रे हातीं येतांच एक **स्पेशल स्मशानअंक** काढण्याचा संकल्प आहे ! या अंकात फोटो यावेत असें इच्छिणारांनीं अगाऊच फोटो काढून ठेवल्यास पुढील यातायात करावी लागणार नाहीं !

—कीं, वेदांततीर्थ गीतारत्न यांच्या तृतिय पत्नी हिस्टेरिआच्या विकारानें वेदाततीर्थांच्या डोळ्यांदेखत मृत्युवश झाल्या ! तिन्ही पत्न्यांत याच काय त्या पतिधर्मपरायण असूनमुद्धां त्यांना जडलेल्या विकारामुळें त्यांच्या अंगचे गुण कोणाच्याहि दृष्टोत्पत्तीस येऊं शकले नाहींत ! जगाच्या रहाटीकडे लक्ष देऊन वेदांततीर्थ पुन्हा संसार थाटण्याचें मनात आणतील तर "गुणिषु नच लिंगं नच वयः" हें त्यांच्या सारख्यास सागावयास पाहिजे असें नाहीं !—मिळो !

—कीं. मद्यपान निषेधाचे पुरस्कर्ते—रा. ब. मुखदुर्बळ गेल्या रविवारीं "एकच प्याला" नाटकास गेले असता "आर्यमंदिरामंडळाच्या प्रवेशांत, त्याना चक्कर येऊन त्यांतच त्याचें देहावसान झालें ! त्यांच्या मागें कोणीहि नसल्यामुळें स्नेही या नात्यानें त्यानीं आपली लाइफ पॉलिसी पेस्तमजी दारुवाला याच्या नावें करून दिली असल्याचें समजतें—मिळो !

—कीं, वैद्यकीय शास्त्राचें उच्च शिक्षण संपादन करून परदेशांतून परत यावयास निघालेले डॉ. धुरंधर बोटींतच हृदयाची क्रिया बंद पडून मरण पावले ! त्यांचे क्रियाकर्मांतर हिंदुधर्मपध्दतीने त्याच्या आग्ल पत्नी स्वतः करणार असून पतीच्या

अस्थी थेम्स नदींत टाकण्यासाठीं विलायतेस घेऊन जाणार आहेत ! मिसेस रूपती धुरंधर यांचें दुःख हलकें करणारा कोण वाटेकरी मिळेल तो खरा !———मिळो !

—कीं सुप्रसिध्द इतिहाससंशोधक तात्या तोतये यांना नुकताच झालेला मुलगा जन्मानंतर तीन तासातच गेला ! सर्व मुलांत हाच काय तो कुलदीपक निघेल असा दृष्टांत आदल्याच दिवशीं तात्यांना झाल्यामुळें त्यांनीं जन्मवेळ बिनचूक मिळावी म्हणून घटियंत्राप्रमाणें कुंडली केली ती शिवाजीच्या कुंडलीशीं तंतोतंत मिळत आहे ! परंतु हिंदुस्थानदेशचें दुर्दैवच म्हटलें पाहिजे दुसरें काय !—मिळो !

## जीविताचें—कोडें

चरितार्थाची फिकीर करीत बसण्यापेक्षां आमच्या कोड्यांत पडून नशिबाला हैराण करा !

सदरहू पत्राच्या एका वर्षाच्या अंकांत येणाऱ्या सर्व लेखांचे मथळे एकत्रित करून त्यांची " **नाट्यछटा** " बनवा !

पहिल्या नंबरास ताहयात वर्गणीदार केले जाऊन पुढील सर्व कोडीं सोडविण्यास वर्गणी पडणार नाहीं.

दुसऱ्या नंबरास " सुखसंचारक कंपनीचे " दहा क्याट-लाग फुकट पाठविण्यांत येतील; त्यांतील वाटेल ती वस्तू आमच्या मार्फत योग्य किंमतीला मिळूं शकेल.



# विक्षिप्तपणाचा मोबदला

" श्रीयुत संपादक किर्लोस्कर ' स्त्री ' मासिक यांस,
सा. न. वि. वि.:—

ह्या पत्राचा मायना लिहून मालती क्षणभर थांबली. मजकुराला सुरुवात कशी करावी हें मनाशीं निश्चित होताच ती पुढें लिहूं लागली:—

" आपण आपल्या " स्त्री " मासिकांत विवाह सुखाबद्दल चालू केलेली चर्चा पाहून मला कित्ती कित्ती आनंद झाला म्हणून सांगूं ! हा प्रश्न कोण कधीं काढील असं मला झालं होतं. आम्हां भगिनीवर्गाविषयीं आपली ही कळकळ पाहून " किर्लोस्करबंधू " हें नांव आपण निःसंशय सार्थ करून दाखवीत आहां असंच म्हणावं लागतं. एकीकडे आमच्या वाढत्या संसारास लागणारे लोखंडी पलंग पाळणे पुरवून संसार-सुखाची वास्तविक स्थिति काय आहे याचीहि आस्था दाखवणं याहून बंधुभाव अधिक तो काय असायचा ? स्त्रियांचीं हीं गाऱ्हाणीं आजपर्यंत कोणी कधीं ऐकून घेतलीं आहेत ? लग्नापासूनच्या हकीगती सांगण्यासारख्या अशा थोड्या का असतात ? पण म्हणतात ना तोंड दाबून बुक्क्यांचा मार. पूर्वीइतकी स्थिति आज फारशी राहिलेली नाहीं हें खरे. इतकं कशाला त्या गोष्टीहि आज खऱ्या वाटणं कठीण. विषयच निघाला म्हणजे बोलल्यावांचून रहावत नाहीं इतकंच. बाकी

सांगावं तितकं थोडंच म्हणा. तसं म्हटलं तर असल्या विषयाची वाच्यता सुद्धां होऊं नये असं वाटतं. आपलेच दांत आणि आपलेच ओठ. त्या आठवणी देखील नकोतसं होतं. शिवकंठांतील हलाहल पुरवलं. असलं वीष ओकून टाकल्याशिवाय कां समाधान वाटणार आहे कशानं ?"

थोडा विचार केल्यासारखें करून मालती पुढें लिहूं लागली:—

"त्या दिवसाची मला चांगली आठवण आहे. स्वतःचा कडेलोट होण्याचा प्रसंग कोणाला आठवत नसेल? मला पाहायला इकडची स्वारी येणार असल्याचं कळल्यापासून मी अस्वस्थच झालें होतें. कुमारिकांना भावी वराकडे मान वर करून पाहण्याचाहि परवाना नसल्यामुळें त्यांच्या मनाचा असा कोंडमारा न होईल तर काय होईल? त्यांत आणखी स्वारीबरोबर स्नेह्यांचाहि ताफा असल्यामुळें माझ्या चोरट्या नजरेनें तरी काय अटकळ करायची? स्वारी खेरीज सर्वत्र दृश्य भयानक वाटून माळ घालते वेळीं खरं कोण तें समजेपर्यंत जिवांत जीव नव्हता. दुसऱ्या दिवशीं आणखी सासुबाईची खाशी स्वारी आपल्या लेकीसह वधूपरीक्षणार्थ येणार असल्याचें ऐकून अविवाहित राहिलेलं पुरवलं अस्सं मला झालं. परंतु असं म्हणून थोडंच चालणार आहे आम्हां बायकांचं! आमच्या जन्मसिद्ध पापाचं क्षालन शरीरदानावांचून कसं व्हायचं? खुद्द विदीण येण्यापर्यंत मजल गेलेली पाहून पहिल्या परीक्षेंत मला पासापुरते तरी मार्क मिळाले

असावेत या कल्पनेंत आईनं येणाऱ्या या वरिष्ट डेपुटीचं स्वागत यथास्थित केलंन. माझ्या मनाला मात्र आलेल्या मायलेकींकडे पाहून अधिकच धक्का बसला. सासुबाईच्या शरीरसंपत्तीच्या मानानें मला क्षयाची भावना असावी असें कोणालाहि वाटण्या-सारखं होतं. लेकीकडे पाहून " बापसे बेटा सवाई " ही पुरुष-वाचक म्हणही बिनदिक्कत लावतां येती. बेटीवरून दोन बोटं सरसच स्वारी असेल या कल्पनेनं माझ्या डोळ्यापुढें तिबेटच दिसूं लागलं. यापेक्षां विहिरीचं पाणी ग्रहण केलेलं काय वाईट असंही मला वाटल्यावांचून राहिलं नाहीं. माझ्याकडे पाहून तोंड वाकडं करायला मायलेकींच्या चेहेरेपट्टींत नांवालाहि सरळपणा नसल्यामुळे माझ्याबद्दलचा त्यांचा राग दृग्गोचर होण्यासारखा नव्हता. त्याच्या बोलण्यावरून क्षयाची भावना त्यांच्या मनानें पुरी घेतल्यासारखी वाटून मला कांहींसा धीर आला. परंतु बाबांनीं हुंड्याच्या रकमेची वृद्धि करतांच माझा क्षयासारखा रोग नाहींसा होऊन मला पदरांत घेण्याच्या ठरा-वाला योग्य ती पुष्टी मिळाल्यामुळें तो अखेरच्या बैटकींत पास करण्यांत आला. लवकरच माझा कडेलोट करण्याचा समारंभ मोठ्या थाटानें पार पडून या करग्रहणांत बाबा जन्माचे कर्ज-बाजारी, आई अखेरची आजारी आणि मी कायमची माहेरी झाल्याचें स्पष्ट दिसून आलं. "

या ठिकाणीं मालतीच्या हातांतील लेखणीनेंहि शाईरूप अश्रूचा ढाळलेला टिपका ब्लॉटींगनें टिपून ती पुढील मजकूर लिहूं लागली.

" लग्नाचा हा सुखसोहळा कधीं संपतो असं मला झालं होतं. पुरुषांसारखे पुरुष स्वतःच्या लग्नांत मात्र मेषपात्र बनून सर्कशींतील जनावराप्रमाणें वागतांना पाहून मला इकडची कींवच आली. स्वारीकडे माळ घालण्यापलिकडे कोणताच अधिकार ठेवलेला नव्हता असं म्हटलं तरी चालेल. इतकं कशाला माझ्याकडे तिरप्या नजरेनेंहि पाहण्याची प्राज्ञा नव्हती. घास देतांना देखील वन्साकडे बघत रहावं लागून हातांतला घास नाकांत जाऊं नये म्हणून मलाच तो सावरून घ्यावा लागे. विडी तोडण्यासाठीं मी कांहींशी जवळ झालें तोंच " हं इतकी नको कांहीं लगट करायला अगदीं " असं वन्सांचं सेनापतीच्या स्वरांतील फरमान ऐकतांच विडी तोडण्याची सक्त मनाई आहे असं समजून मी आपली मुकाट्यानें खालींच बसलें. वन्साच्या समोर, ' समोरच्या कोनड्या ' खेरीज उखाणा घेण्याचं नावच नको. मानपानाची खंडणी वसूल करून घेण्यातील मायलेकींच्या करडेपणाची बरोबरी एखाद्या महाबलाढ्य राष्ट्राच्यानेंहि झाली नसती. शिवाय वधूपक्षाचा अपमान करण्याचा मान वरपक्षाकडे राखून ठेवलेला असल्यामुळें खालीं मान घालून मुकाट्यानें सर्व सहनच केलं पाहिजे. मामंजी हयात असते तर आणखी काय होतं तें नकळे ! सासुबाईंच्या लग्नापासूनच ते म्हणे भ्रमिष्ठासारखे होऊन गेली दहा वर्षे ते जे नरसोबाच्या वाडीला जाऊन बसले ते त्यांनीं कांहीं पुन्हा घराचं दर्शन घेतलं नाहीं. "

राहिलेला मजकूर केव्हां एकदा संपतो असें मालतीला होऊन द्विगुणित गतीनें ती लिहूं लागली:—

" लग्नाच्या रंगीत तालमेवरून पुढील सासुरवाससुखाची कल्पना होण्यासारखी होती. सीतामाऊलीनें वनवास पतकरण्यांतील रहस्य अनुभवानेंच माझ्या प्रत्ययास आल्यावांचून राहिलं नाहीं. ती बिचारी तीन सासवांच्या तडाक्यात सापडती तर रामायणाची लवकुशाख्यानापर्यंत मजल जाण्यापूर्वीच तिला राम म्हणावं लागलं असतं. सासरचा उंबरटा मी ओलांडतांच सुनमुख पाहण्यासाठीं आतुर झालेल्या सासुबाईचें मुख माझ्याकडे कायमचचं फिरलं. सोवळ्या ओवळयाच्या बाबतींत तर माझी सावली देखील त्या टाळीत कीं काय असं दिसे. लग्नापासून मी जणूं काय अस्पृश्य झाल्यासारखी मला वाटे. अस्पर्श झाल्यावर घरात तरी घेतील कीं नाहीं अशी मला भीति पडली. "

" लेकीच्या गुणांमुळेंच सुनेची गणना मनुष्यकोटींतही होऊं शकत नाहीं असं माझ्या ऐकण्यात होतं त्याचा प्रत्यय येऊन उलट सासू हा प्राणीच मानवजातीहून भिन्न असल्याबद्दल माझी खात्री झाली. सासुबाईच्या तोंडून वन्सांचं गुणवर्णन ऐकणाराला पुढील जन्मीं तरी या दोघींपैकीं कोणाच्या पोटीं जन्मास यावं हें ठरवितां येणं कठीण. या मायलेकीचं पहिल्यापासून कांहीं म्हणे इतकं सूत नव्हतं. पण माझं हें भूत घरांत शिरल्यापासून त्यांच्या प्रेमाला ऊत आला होता. वन्सांच्या अंगच्या नसत्या एक एक गुणा-

बरोबर माझ्यामधील नाहीं त्या दुर्गुणाची उजळी ऐकून ऐकून मला तर किती दिवस ऐकूंच येईनासं झालं होतं. त्यामुळें माझ्या दुर्गुणांत आणखी एक बहिरेपणाची आयतीच भर पडून शेवट मुकं पण व्हावं लागलं. खरं म्हटलं तर वन्साना निर्माण करतांना ब्रम्हदेव किती वैतागलेला असावा याची साक्ष वन्सांची रुसलेली रूपसंपदा मूर्तिमंत देत होती. त्याच्या रूपाला अनुरूप वर मिळाला म्हणून ठीक. बाकी ठीक म्हणायला तो तरी लाभलाय कुठं म्हणा ! मुखचंद्रावरील शक्य तितके डाग झाकण्यासाठीं वन्सानीं कुंकवाचा घेर चांगला चांदोबासारखा वाढवूनही अखेर त्यालाहि खग्रास ग्रहण लावण्याचंच कपाळीं आलं ! लिहिण्या वाचण्याच्या बाबतींत तर आवळयाएवढं पूज्य ! कधीं काळीं यजमानांचं पत्र आलंच तर तें भाऊजींच्या लहरीप्रमाणें वाचून घेतील तेव्हां काय तें कळायचें. उत्तर पाठविण्याचं तर नांवच नको. कला-कुसरीच्या कामांत शेणामातीच्या गोंवऱ्या वळण्यापलीकडे कांहीं येत असेल तर शपथ. त्यांच्या हातच्या गोंवऱ्यांच्या पर्वतप्राय ढिगाकडे पाहून सासूबाईना मात्र स्वर्ग दोन बोटं उरल्यासारखा होऊन हें दोन बोटांचं अंतर तोडण्यासही तोच ढीग उपयोगी पडून बाहेरचं जळवण कांहीं आणावं नाहीं लागलं वेगळं. मी माहेराहून आणलेल्या लोंकरीचा नाहीं म्हणायला वन्सांनीं आपल्या यजमानासाठीं गळपट्टा घेतला होता विणायला. पण हें विणकाम पुरं होण्यापूर्वीच त्या बिचाऱ्याच्या गळयाला यमपाश लागून बायकोच्या हातचा

गळपट्टा स्त्रीधन म्हणूनच राहिलं. वन्सांनीं आपल्या शालजोडीला या गळपट्ट्याची हशावजा झालर लावून आपली हौस पुरवून घेतली. वर्षासणाला माझ्या माहेरीं पाठविण्यासाठीं सासुबाईंनीं लेकीकडून तिळगूळ करून धाडला तो पाहतांच माझ्या आईच्या अंगावर मात्र कांटा आला. "चिवडा" असेल अशी बाबांची समजूत करून आईनें तो त्यांना चांगलासा दिसूंहि दिला नाहीं. बाबांनाहि चिवड्याचा भास झाला म्हणून ठीक, नाहींतर तोच मेवा परत भेट म्हणून पाठविण्यास ते कमी करते ना. वन्सांचा गळा दिसायला चांगला भरदार होता खरा, परंतु त्यांतून निघणारा आवाज तितकाच किरटा असल्यामुळें त्या हंसताहेत का किंचाळताहेत हें कळणंच दुरापास्त. घरटाच्या नाहीं तर निदान जात्याच्या घरघराटाची साथ नसेल तर वन्सांचं गाणं ऐकणं म्हणजे मरणंच तें! वन्सं बोलूं लागल्या कीं बायकोची थुंकी नवऱ्याला किती झेलावी लागली असेल याची कल्पना होई. वन्सांनीं ढेकर दिल्यावर गोठ्यातील पारडूं रेकलं नाहीं असं कधीं झालं नाहीं. नवरा मेल्याचं दुःख लेकांनं कसं डोळ्यांतून थेंब न काढतां गट्ट केलंन याचीच सासुबाईंना धन्यता वाटून वन्साच्या ह्या स्थितींतही त्यांची दृष्ट काढल्यावांचून त्यांना रहावलं नाहीं. खरं तरी वाटेल का हें कुणाला?

भाऊजी तर काय बोलून चालून लहानच. त्यांचे चाळे कोठवर सांगावे. त्यांचा मार चुकविण्यासाठीं मी कांहीं

करायला जावं तर उलट तें माझ्यावरच यावयाचं. वन्सांची कुंकवाची पेटी कुठं दिसेनाशी झाली. वन्सांना त्याची वास्तविक गरजही उरलेली नसतांहि तो सांपडे तो त्यांच्या डोळ्याचं पाणी कांहीं खळलं नाहीं. शेवट भाऊजींच्या कपाटांतूनच मी मुकाट्यानें सांपडून दिली आणि चोरीचा आळ मात्र माझ्यावरच आला. सोवळ्याची लंगोटी भाऊजी कुठं सोडून टाकतील त्याचा नियम नसावयाचा. काळोखात सासुबाईंच्या हातीं ती लागतां चिंधी समजून तिचा काकडा करून चूल पेटवली. चुलींतून राख काढतांना लंगोटीचं जळकं थोटुक न सांपडतं तर हें प्रकरण किती पेटतं न कळे !

आता माझ्या पायगुणाबद्दल म्हणाल तर पायच काय ते तोडून टाकायचे राहिले होते माझे. सासुबाईंच्या मामंजींच्यां वेळची कावी गाय माझी दृष्ट लागून मेली असं ठरवून दुधाचा थेंबही माझ्या दृष्टी पडूं देत नसत. जिन्यावरून पडून सासुबाईंचा पाय मोडला तो माझाच पायगुण ! वन्साना मूल होईना त्याला मी काय करणार ? पण तो दोषही माझाच. इतकं कशाला वन्सांच्या डोक्यांतील उवा माझ्या माहेरच्या म्हणून तें पाप माझ्या माथीं मारण्यास कमी केलं नाहीं. सासुबाई होत्या तोंवर बोलायलाच नको. गेल्या सालीं प्लेगची साथ न उठती तर माझ्या मागचा वन्सांचा जाच चुकता ना !

रहातां राहिलीं इकडील स्वारी-पण-इश्श-तें बाई कसं सांगायचं ? इतका छळ ज्या प्रेमाखातर सोसला-त्याचं वर्णन-छे-पण-नकोच तें-उगिच हसं मात्र व्हायचं.

नम्र भगिनी

**मालती जयवंत.**

मालतीचें पत्र पुरे होऊन ती जागेवरून उठणार तोंच प्रेमाचें अंधत्व प्रत्ययास आणून देण्यासाठींच कीं काय तिचे डोळे घट्ट झाकणारे हात जोरानें दूर ढकलून मालती मागें वळून पहाते तों तिला जयवंतावाचून कोण दिसणार ? ज्याची मार्गप्रतीक्षा करण्यातील वेळ लवकर निघून जावा म्हणून तिने आपलें मन लेखनांत गुंतवले होतें तो जयवंत केव्हा आला हें पण तिला कळलें नाहीं. परंतु त्याहि पेक्षां पत्रांतील वात्यपणा जयवंताला इत्थंभूत पहायला मिळाला असावा या कल्पनेनें ती खजिलच झाली. जयवंताच्या या वागण्यानें खरोखरीच ती विरमली का चिडली हें तिचें तिलाहि सांगता आलें नसतें. इतकें मात्र खरें कीं उसना रुसवा आणून ' मला नाहीं आवडत असला चावटपणा ' असें कांहींसें पुटपुटत रोषदृष्टीनें ती जयवंताकडे पाहूं लागली.

" मालती, तुझ्या वात्यपणाची मजल येथवर जाईल असें मलाहि कधीं वाटलं नव्हतं. थांब आतां हेंच पत्र तुझ्या भावी वन्सांना दाखवितों म्हणजे समजेल काय तें, " असें म्हणत

जयवंतनें टेबलावरील पत्र हस्तगत केलें. गोंधळून गेलेल्या मालतीला कसलाच प्रतिकार करण्याचें सामर्थ्य राहिलेलें नव्हतें.

" हें, पहा शपथ आहे हं माझी " इतकेच शब्द कसे तरी तिच्या तोंडावाटे निघून जयवंताच्या खिशांतून पत्र काढून घेण्यासाठीं हळूंच पुढें सरसावलेला तिचा हात जयवंतानें आपल्या हृदयाशींच घट्ट धरून ठेवलान. मालतीचा अगदींच नाइलाज होऊन ती जयवंताकडे हताश नजरेनें बघत राहिली. या अनुकूल परिस्थितीचा फायदा घेऊन जयवंत म्हणाला......

"खरोखरीच पत्र परत पाहिजे असेल तर मला आजपर्यंत न मिळालेला असा गोड मोबदला द्यावा लागेल."

अखेर मालतीच्या हातीं पत्र मिळालें. यावरून जयवंताची अट मान्य झाली असावी हें उघडच होय.



# स्वतंत्र संगीत-परिषद्

सदरहू परिषदेची पहिली खास बैठक, नाताळच्या इरताळांत, वेताळपूर मुक्कामीं रा. ब. अं. ति. शहाणे[1] यांच्या अध्यक्षत्वाखालीं—परंतु अपरिहार्य कारणानें खालीं झालेल्या अध्यक्षपदावर, चालचलाऊ अध्यक्षांची निवड होऊन, कोणत्याहि विघ्नांना न जुमानतां, मोठ्या कष्टातीत थाटानें पसार झाली. सभा उधळून लावण्याचा कांहीं विघ्नसंतोषी मंडळींचा प्रयत्न होता; परंतु रावबहादुरांच्या सत्तेपुढें कोणाचें शहाणपण चालूं शकलें नाहीं ! वेळ आलीच तर सभासदांस सहज पळ काढता यावा एवढ्यासाठीं मंडपाची योजना रद्द करून नदी-किनाऱ्यावरील खुल्या वाळवंटावर सभा भरविण्यांत आल्यामुळें जागेचा संकोचही भासला नाहीं. अपरिहार्य संकटांखेरीज सभेवर म्हणण्यासारखा असा कोणताच प्रसंग गुदरला नाहीं. येऊं नये ती आपत्ती आलीच तर बैठकीचें सामान धावपळींत पसार करतां येणें गैरसोईचें वाटून ती भानगडही काढून टाकण्यांत आली होती. अध्यक्षासाठीं एका दगडाला धोतर गुंडाळून शोभिवंत उच्चासन मात्र मात्र करावें लागलें. सभासदांनीं स्वरक्षणासाठीं लाठीशिवाय येऊं नये अशी सूचना अगाऊच दिलेली असल्यामुळें सभावाळवंट लाठ्यांनीं चिकार भरून गेल्यासारखें दिसत होतें. चांदणी रात्र असल्यानें दिवाबत्तीच्या खर्चाची बचत

---

१ अनंत तिमाजी शहाणे

होऊन त्या रकमेंत शेलक्या मंडळींना थाटाची मेजवानी देण्याचा ठराव सर्वानुमतें पास झाला होता.

ठरलेल्या वेळीं सभास्थानीं कांहीं इतस्ततः भटकणाऱ्या गुरांखेरीज कोणीच हजर राहूं शकलें नाहीं. गुरांना पिटाळून लावून त्यांनीं केलेली घाण काढून टाकण्यांत बराच वेळ मोड. ल्यामुळें सभेच्या कामाला विलंब झाला. आरंभीं फारसा बखेडा माजला नाहीं. नाहीं म्हणायला अलिकडील ठराविक सांप्रदायाप्रमाणें अध्यक्षांना अंडीं ग्वाण्याचा प्रसंग आला, परंतु तो त्यांनीं मोठ्या शांतपणें गिळून टाकला.

ठिकठिकाणाहून आलेल्या प्रतिनिधींत, कविवर्य '**भृंगी**', काव्यशेखर '**शृंगी**', काव्यगानसम्राट '**कोकिळानुज**', शाहीरवीर '**शंखनाद**', मोफत संगीत शाळेचे प्रिन्सिपॉल '**प्रो. तुंबर**', उस्ताद '**गदिंगनखा**', बेकारपूरदरबारचे नामदार गायक '**फजितखा**', वाद्यपटू '**ताऊसहुसेन**', प्रख्यात तंतकार '**दिरदिरअल्ली**', गायनाचार्य '**भुजंगनाथ**', संगीतरत्न '**सरगमकर**', शास्त्रोक्त संगीत विद्यालयाचे माजी संस्थापक पंडित '**नोमथोम**', हरिभक्तपरायण '**पाखांडेश्वरबुवा**', वगैरे अनेक कवि, संगीतज्ञ, गुणिजनांखेरीज, देशोद्धारपत्राचे संपादक "**बी.**[२] **सी. शिवराळकर**", "दे. भ. **एम्. टी. बोलघेवडे**", "गरमागरम" साप्ताहिकाचे रिपोर्टर **ना. नाँ.**[३] **उपद्व्यापी**, नटवर्य गानकिन्नर सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक **पु. रा. विध्वंस**

२ Best-compliments. ३ **नारायण नागेश.**

ही निमंत्रित मंडळी हजर असून स्थानिक सभासदांत 'विद्या-वाचस्पति' **तोत्रे**, "नगराध्यक्ष रावसाहेब **पायखाने**", नगर-शेठ दिवालचंद, "**डॉ. टी. बी.**[४] **निरोगी**" ही मंडळी प्रामुख्यानें दिसत होती.

"मोफत संगीत शाळेच्या" अनाथ विद्यार्थ्यांचें ईश-स्तवनपर करुणाष्टक संपल्यावर कविवर्य 'भृंगी' याचें समयोचित काव्यगायन झालें. 'मृत्यूच्या मुखात' ही त्याची आरंभीचीच कविता इतकी हृदयस्पर्शी झाली कीं भाषा-अभिज्ञ 'दिरदिर अश्लीला' दरदरून घामच सुटला. ताल सुराचा भेद करून कविवर्यांच्या भावनेनें अखेरचा फोडलेला टाहो ऐकून "गदिगनखाची" दातखिळीच बसली ! "कुछ आंग्रेजी गाना होगा" असें पुटपुटत "पिसाब करके आता हूं" असें म्हणून "फजितखा" कॉर्डी फोडून बाहेर पडला. "ताऊसहुसेन" कविवर्यांच्या तोंडाकडे पहात राहिला. पंडित "नोमथोम" गुरगुरू लागले होते; परंतु गायनाचार्य "भुजंगनाथ" ह्यांच्या कानाशीं काहींसें फुत्कारताच त्यांना सारी गम खावी लागली. आणखी एखादी कविता व्हावी म्हणून रसिक श्रोत्यांकडून आग्रह चालू होता. परंतु संगीतज्ञ मंडळी उठून जाऊं लागल्यामुळें कविवर्यांना आटोपतें घेऊन बसावें लागलें.

स्वागताध्यक्ष हयात राहूं न शकल्यामुळें त्यांचें मृत भाषण वाचून ऐकविण्यांत आलें ! कार्यवाहक **व. शि. तट्टू** वाटेंतच

४ Tuberculosis.

अडकून पडल्यामुळें अध्यक्षांचा परिचय विद्यावाचस्पति तोत्रे यांनीं करून दिला. त्याचें अडखळतें भाषण छापण्याची मुद्रणालयांत सोय नसल्यामुळें तें सारांशरूपानें द्यावें लागत आहे. विद्यावाचस्पति आपल्या भाषणांत म्हणाले:—

" श्री. तट्टूंच्या अभावीं हा जबाबदारीचा बोजा माझ्या-वर लादला जात असला तरी अध्यक्षांची ओळख कशी हें मीही ओळखतों. इतकेंच नाहीं तर अध्यक्ष माझ्या ओळखींचेच आहेत. ही ओळख आज कदाचित यांना नसली तरी ती लवकरच पटेल हें पण मी ओळखून आहे.

" आपलं नांव कोणी सार्थ करून दाखवलं असेल, नांव काढण्यासारखं नांव कोणी काढलं असेल, नांव ठेवतां येणार नाहीं असं कोणाचं नांव असेल, तर ते आपले सन्माननीय अध्यक्ष रा. ब. शहाणे हे होत. परिषदेच्या अध्यक्षपदाला त्यांच्या सारख्यांचे पाय लागावेत हा चतुष्पादयोग अपूर्व नाहीं असें कोण म्हणेल? मी हें तोंडापुरतं बोलत नसून रावबहादुरांच्या तोंडावर स्पष्टपणें सांगत आहे. "

" यःकश्चित पट्टेवाल्याच्या नौकरीपासून स्वतःच्या पायावर उभे राहून अपमानाची खंत न बाळगतां हा बहुमान संपादन करणें अमानुषच नव्हे तर काय? मी त्यांचा वर्गबंधु आहे हें सांगण्यास मला मोठा अभिमान वाटत आहे. "

" शाळेंतील एक एक गोष्टी आठवल्या म्हणजे त्या वेळचा "**अंत्या**"—रावसाहेबांना लहानपणीं या नांवानें संबोधित

असत—पुढें रावबहादूर होणार हें ब्रह्मदेवाच्या बापालाहि सांगतां आलं नसतं. शाळेच्या मधल्या सुटींत आम्ही दोघे सर्वांची नजर चुकवून विड्या पीत असूं हें रा. ब. ना आठवतच असेल. तमाशाची हकिगत तर ते कधींच विसरले नसतील. त्या दिवशीं रा. ब. रावर भलताच प्रसंग गुदरणार असें पाहून त्यांना लुगडें गुंडाळून स्वतःची बायको म्हणून ज्यांनीं पसार केलें तोच हा " **गणू तोत्रे,** " ही मी त्यांना पाहिजे तर विशेष आठवण करून देतों. रा. ब. रांच्या अंगचे एक एक गुण त्या वेळीं कोणाच्याच लक्षात आले नाहींत. वर्गांत शेवटला नंबर राख-ण्यांतील त्यांचा विनय त्यांच्या विद्येला साजेसाच होय असें आज मी म्हणूं शकतों. सहनशीलतेंत त्यांची बरोबरी करणारा विद्यार्थी विरळाच ! मास्तरांच्या माराला तोंड देतांना त्यांनीं कधीं वाकडें तोंड केलें नाहीं. पुढें आता विकारानें त्यांचें तोंड वाकडं व्हावं ही गोष्ट वेगळी. एक दिवस मास्तरांची नाहींशी झालेली चंची नेमकी रा. ब. रांच्या खिशांतच कशी सांपडली तें हरि जाणे ! तेवढ्यावरून मास्तरांनीं त्यांना वर्गाबाहेर घाल-विलें. हा अपमान सहन न होऊन पुन्हां त्यांनीं कोठल्याच शाळेचें मुखावलोकन केलें नाहीं तें नाहींच ! शाळेला बहिष्कार घालण्याची कल्पना नवी नसून त्याचें मूळ श्रेय रा. ब. रांकडे येतें असें मी स्पष्ट म्हणतों "

" स्वयंपाक करण्यांत देखील रा. ब. कोणाची डाळ शिजूं देणार नाहींत. या बाबतींत तर त्याना आचार्योचार्य ही

पदवी देण्यास प्रत्यवाय नाहीं. कांहीं दिवस तर त्यांना हीच नौकरी करावी लागली. मनुष्यावर संकटें येऊं लागलीं कीं तीं कशीं येतील याचा नियम नसतो. या ठिकाणीं त्यांच्या तारुण्या-वर भलताच आळ येऊन त्यांना गांव मोडून जाणं भाग झालं. परंतु लाज सोडावी लागली तरी धीर सोडायचा नाहीं हा त्यांचा बाणेदारपणा आदरणीय होय! रा. ब. यांचें चरित्र पुढें मागें प्रसिद्ध होईलच. परंतु त्यांत मागे घडलेल्या हकिगती पुढें येण्यासारख्या नसल्यामुळें त्यांचें थोडक्यात दिग्दर्शन करावं लागलं."

"पुरुषांचं दैव केव्हां उमटेल याचा नियम नसतो हें रा. ब. रांच्या उदाहरणावरून दिसून येतें. वीस वर्षांपूर्वी ज्या रा. ब. रांची अन्नान्न स्थिति होती तेच रा. ब. अन्नवस्त्रच काय पण अंगवस्त्रही राखून असल्याचें सर्वश्रुतच आहे! ज्या साहे-बांच्या कृपेनें रा. ब. रांचे भाग्य उदयाला आलें त्या साहेबांच्या मेमसाहेबांची कुत्री जातिबांधवाच्या नादीं लागून फरारी झाली होती. ती रा. ब. रांनीं पकडून दिल्याबद्दल मेमसाहेब प्रसन्न होऊन रा. ब. यांस प्रथम याच कामावर नोकरीस ठेऊन घेतलें. होतां होता आजची स्थिति प्राप्त झाली. यावरून रा. ब. यांची योग्यता कोणालाहि कळून येईल." इतकें सांगून विद्यावाचस्पतींनी अध्यक्षस्थान स्वीकारण्याबद्दल रावबहादुर यांस विनंति केली. दुजोऱ्याची वाट न पहातां रा. ब. स्थानापन्न होऊन त्यांनीं आपल्या भाषणास आरंभ केला. या वेळीं टाळ्याचा

प्रचंड कडकडाट व्हावयाचा, पण रा. ब. यांना हृदयाचा विकार जडल्यापासून कोणताहि मोठा ध्वनी झालेला त्यांना सोसत नसे हें समजल्यामुळें सर्वांना आपले हात आवरून धरावे लागले. हाराचा भारही सोसणार नाहीं म्हणून तो बैठकीच्या दगडालाच अर्पण करावा लागला. भाषणाला आरंभ करण्यास पुरेसे अवसान आल्यावर ते बोलूं लागले:—म्हणजे लिहून आणलेले वाचूं लागले.

" सज्जन हो व अहो सज्जनींनो, ( हंशा होत असल्याचें कारण लक्षांत येऊन ) होय मी असेंच म्हणतों. सार्वजनिक ठिकाणीं हजर न राहणें या स्त्रियांच्या सज्जनतेला उद्देशूनच मला असा उल्लेख करावासा वाटतो. आपण मला आज तो मान देत आहा त्यापेक्षां माझी अधिक ती अपेक्षा काय असावयाची ? हा योग एक प्रकारें अपूर्व व दुसऱ्या बाजूनें पूर्वपश्चिम असा आहे. अपूर्व म्हणण्याचं कारण, उभ्या आयुष्यांत अशा प्रकारचा बहुमान मला कधीं मिळालेला नाहीं हें प्रांजलपणें व्यक्त करणं कोणाहि मोठ्या मनुष्याचं कर्तव्यच होय. उत्तरेकडील संगीत आणि दक्षिणेकडील अध्यक्ष हा विपर्यास सोडून दिला तरी संगीताचा व माझा पूर्वपश्चिम संबंध असल्यामुळें ही निवड करण्यांत आपली दिशाभूल झालेली दिसून येते. या बहुमानाला मी पात्र नाहीं हें आपण जाणत असालच. असें असून आपण हा जो माझा सन्मान करीत अहां त्याबद्दल आपणाला काय म्हणावं तें मला कळत नाहीं. संगीत-परिषदेला

लायक असा अध्यक्ष मिळूं नये, याबद्दल अध्यक्ष या नात्यानें खेद प्रदर्शित करतांना मला मोठा आनंद वाटतो कीं आपल्या सर्वांचें आभार मानण्याची संधी आज मला मिळत आहे. अशा प्रकारचा हा पहिलाच प्रसंग असला तरी याहून अधिक बिकट प्रसंग माझ्यावर गुदरलेले आहेत. त्याचें दिग्दर्शन माझे बालमित्र विद्यावाचस्पति तोत्रे यांनीं केलेलेंच असल्यामुळें मी आपला अधिक वेळ घेऊं इच्छित नाहीं.

मी या विषयीं अज्ञ आहे हें जाणून माझ्या भापणाला पुरेल इतकी माहिती मिळविणं मला प्राप्तच झालें आणि त्याच्यावर विचार करून नवीन सुचलेल्या कल्पना सर्वस्वी माझ्या स्वतःच्या होत. त्या सारांशरूपानें सांगतो.

सुभाषित, गीत व तरुणींच्या लीला, यांनीं ज्याचं मन-हरण होणार नाहीं तो मुक्त अथवा पशू हें सुभाषितकारांचं वचन कांहींसें विपर्यस्त समजतों; माझ्या मतें असा प्राणीच संभवत नाहीं. मुक्त झाला म्हणून काय तो जन्मतःच मुक्त असतो असं थोडंच आहे ? विषयवासना उपभोगाखेरीज नष्ट व्हावयाच्या नाहींत असं माझं ठाम मत आहे. अर्थात् मुक्त देखील प्रथम विषयलोलुप असला पाहिजे हें उघडच झालं; आतां पशूंची भाषा आपणाला कळत नसली म्हणून त्यांच्या मध्येंहि भाषाभिरुचि नसेल किंवा सुभाषितकार झाला नसेल असें म्हणतां येणार नाहीं; गायनाच्या नादानें पशुपक्षी देखील लुब्ध होत नाहींत काय? इतकें कशाला ? संगीतामधील सप्तस्वर

पशुपक्ष्यांच्या आवाजाचेच नमुने असतां पशूंना संगीतविषयांत कमी लेखण्याचं कारण नाहीं. युवतीविषयक लीलाभिरुचि पशूंना नसते असं मानणं म्हणजे निसर्गाचं रहस्य न समजल्याप्रमाणेंच होय. आता इतकं खरं कीं या तीन प्रकारांपैकीं एखाद्याच विषयाची आवड एखाद्याच्या ठिकाणीं असूं शकेल हें मी स्वानुभवावरून सांगतों; त्यांतूनही मुक्त व्हावं अशी माझी अखेरची इच्छा आहे.

कलेचीं ओळख सहसा कोणाला झालेली नसते; यावरून संगीताला कला म्हणावयास प्रत्यवाय नाहीं. गातांना होणाऱ्या मुखविक्षेपांकडे पाहिलं असतां ही कला किती कष्टसाध्य असावी हें दिसून येतें. नादब्रह्म म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. कोटला का नाद असेना तो एकदा लागला कीं सुटत नाहीं हेंच त्याचें नावांमधील अनंतत्व असलं पाहिजे. आद्य नायक नारद यांच्या नाद आणि नार हे अन्योन्य संबंधही लक्ष्यांत घेण्यासारखे आहेत. सत्व, रज व तम हे त्रिगुण संगीतांत स्वर, राग, आणि ताल या स्वरूपात दिसून येतात. सा री ग म प ध नी या सप्तस्वरमालिकेंतही सकाराला अग्रस्थान देण्याचं कारण सत्वगुणावांचून काय असणार ? अन्यार्थानें स्वर म्हणजे संगीताचें सत्वच नाहीं तर काय ? त्यांतील शुद्ध कोमलपणा सत्वगुणद्योतक आहे हेंच खरं होय. राग म्हणजे प्रेम हें रजोगुणप्रधानच आहे. प्रेमही आळवावेंच लागतें. इतकेंहि करून तें आळवावरच्या पाण्याप्रमाणें चंचल

असतं. रागदारींतही हाच प्रकार आहे. दिवसाचा राग रात्रीला राहूं शकत नाहीं आणि रात्रीचा राग पहाटेपर्यंत टिकत नाहीं. प्रेमांत पण वर्ज्यावर्ज्यांची भानगड आहेच. या खेरीज आरोह अवरोहादि अनेक प्रकारांची संगती मी लावलेली आहे, परंतु शिष्टाचाराच्या बंधनामुळें अधिक विवरण करतां येत नाहीं.

ताल हा तमगुणप्रधान असल्याचं उघड उघड दिसून येतं. थापा मारणं हें तमगुणाचंच लक्षण होय. धृपद धमारादि तालप्रकरणांत हा गुण विशेष स्पष्टपणें प्रत्ययास येतो. गायन-वादनांत हम्मेश होणारे तंटेबखेडे तमधर्माची साक्ष देतात. सारांश संगीतामध्यें सत्व, रज व तम हे गुण आहेत यात शंका नाहीं.

गायनाला तंबोरा लागतो याचं कारण तरी काय? तर त्यात ब्रह्मा, विष्णु महेश हे सूक्ष्मरूपानें वास्तव्य करीत आहेत. षड्ज, व खर्ज्य हींच तीं स्वरूपें होत. ब्रह्मदेवानें केलेल्या अत्याचारामुळं त्याला आपलं एक तोंड काळं करावं लागलं असावं. नाहीं तर तो पंचमुखीच असला पाहिजे. पांचामुखीं परमेश्वर म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. अर्थात् तंबोऱ्यामधील पंचमाची पहिली तार ब्रह्मस्वरूप होय. नंतर षड्जच्या दोन तारा असल्यामुळें त्याला जोड ही संज्ञा आहे. लक्ष्मीनारायणाची जोडी ब्रह्मांडांत एकच. ब्रह्मदेवाची उत्पत्ती नारायणापासून व्हावी त्याचप्रमाणें षड्जापासून पंचम उत्पन्न झाला. पंचम स्वरही नाभिकमळापासून निघत असला पाहिजे. स्वराचं संरक्षण

करणं हें षड्जाचं कार्य होय. विष्णूचें कार्य तसेंच नाहीं तर काय? खर्ज अथवा घोर हें सृष्टिसंहारक महेशाचें द्योतक यांत शंका नाहीं. मृ... ोर काय सामान्य आहे? भवसागरांत बुडूं नये म्हणून तंबोऱ्याला भोपळा जोडावा लागला. संगीता-मधील मंद्र, मध्यम व तार हीं सप्तकें अनुक्रमें पाताळ, मृत्यु व स्वर्गदर्शन होत. मंद्रसप्तकात स्वर खोल जातो, मध्यमांत खोल नाहीं व वर नाहीं असा असतो आणि तार सप्तकांत जातांना दृष्टि आकाशाकडे वळली जाते. सम, ताल व काल हे प्रकार, सकाळ, दुपार, संध्याकाळ या त्रिकालांचा बोध करतात. सकाळप्रमाणें सम हा चिजेचा उठण्याचा समय, ताल हा दुपारसारखा वेळ आणि सायंकाळ म्हणजे काल अथवा खालीं ताल होय. याचप्रमाणें कालदर्शक वर्षाची विल्हेवारी केली असल्याचें तालांच्या जातिभेदावरून कसें तें पहा. त्रिता-लाच्या सोळा मात्रा काय किंवा आठ मात्रा काय हिशेब सारखाच असल्यामुळें आट प्रहर किंवा आटवडा म्हणजे त्रिताल; बारा मात्रांचा चौताला किंवा एकताल म्हणजे बारा महिने; अधिकमास म्हणजे तेरा मात्राचा "फरदोस्तताल"; पंधरवडा म्हणजे "सवारी"; सातवार म्हणजे "रूपक"; त्याचीच दुप्पट म्हणजे "धमार" "आडाचौताल" "झुंमरा" "दीपचंदी"; महिन्याचा तिसरा हिस्सा म्हणजे "झपताल" "मुलफाक" वगैरे सर्व तालांची संगती निर्विवाद लागते.

उत्पत्ती हें निसर्गाचं कार्य संगीतानं साधलं जातं. असं एका पंडिताचं म्हणणं आहे तें खरं असलं पाहिजे. प्राणि-

मात्राच्या ठिकाणीं दिलेला आवाजाचा धर्म अवश्य तें प्रियाराधन करण्याकरतांच आहे असें या पंडितानें भ्रमराच्या गुंजारवापासून तों रातकिड्यांच्या किर्र आवाजापर्यंतचे अनेक दाखले देऊन सिद्ध केलं आहे.

विश्वामित्राची तपश्चर्या भंग करण्यासाटीं अप्सरेची योजना करण्यांत तिच्या सौंदर्याबरोबरच गायनकलेची अनुकूलता हें एक महत्वाचं अंग स्पष्ट दिसून येतं. श्रीकृष्णाची मुरली याची उत्तम साक्ष देत नाहीं काय ?

रागदारीच्या सामर्थ्यानें प्रकाश, पर्जन्य, याचा प्रत्यय पूर्वी येत असे यांत शंका नाहीं. यावरून पंचमहाभूताना ताब्यांत ठेवण्याची शक्ति संगीतामध्यें निःसंशय असली पाहिजे.

अशा योग्यतेच्या कलेचा शक्य तितका उत्कर्ष व्हावा असें मी मनःपूर्वक इच्छितों."

हें वाचन झाल्यावर अध्यक्ष म्हणाले:—

गाण्यासारख्या गोड विषयाची गोडी मला स्वतःला नसावी याबद्दल मला अत्यंत खेद होतो ! तथापि माझ्या परमपूज्य मातोश्रींना गाण्याचं इतकं वेड होतं कीं माझा जन्म वेड्याच्या इस्पितळांत झाला हें आपणाला माहित असण्याचं कारण नाहीं. मी वडिलांच्या वळणावर निपजल्याबद्दल मातोश्रींना राहून राहून खेद वाटे. परंतु त्याहीपेक्षा खेदाची गोष्ट म्हणजे मला अलिकडे जडलेल्या अपस्मारविकाराचें कारण आनुवंशिक

तानबाजी असं तज्ज्ञांचें मत आहे. गेल्या चार सहा दिवसांत हा विकार वाढल्यामुळें हा लाभ मला घेतां येईल असा भरंवसा नव्हता. हा उपद्रव केव्हां काय करील याचा नियम नसतो–" हें वाक्य पुरें होतें न होतें तोंच अध्यक्षांना फिट येऊन ते पदच्युत झाले.

त्यांना सावध करून घरीं पोंचते करण्यांत सभेच्या कामाची बरीच खोटी झाली. नंतर चालचलाऊ अध्यक्षांची निवड होऊन परिषदेचें पुढील काम चालू झालें.

स्वागताध्यक्ष रावसाहेब **म. रा. भुते** यांच्या अकालीं निधनाबद्दल दुखवट्याचा ठराव मांडतांना **का. क. कर्माधिकारी**[1] रडव्या स्वरांत म्हणाले:—

" हा ठराव मांडतांना मी किती गहिंवरून गेलों आहे हें सांगावयास पाहिजे असं नाहीं. साक्षात रावसाहेबांच्या मरणप्रसंगीं मला आपलं दुःख आवरून धरता आलं. परंतु आज मात्र त्यांची आठवण होतांना भडभडून आल्यावांचून रहात नाहीं. माझ्या कुटुंबांतील बहुतेक माणसं मृत्युवश झालीं, परंतु त्यांच्या आठवणीहि मी विसरल्यासारखाच आहे. इतकं कशाला दोन दिवसांपूर्वींच माझं तृतीय कुटुंब निवर्तल्याचं आपणांस विदितच आहे. तथापि त्याबद्दल इतकं दुःख वाटत नाहीं. याचं कारण पत्नीनिधनाचा प्रसंग हा पहिलाच नसून ही उणीव आजही मला भरून काढतां येण्यासारखी आहे. यापूर्वी मी

१ काशिनाथ कन्नेश्वर.

पुनर्विवाहाच्या विरुद्ध असलों तरी वय व कालमानाकडे लक्ष देऊन मी स्वतः त्या गोष्टीला तयार झालों आहे. रावसाहेबांच्या निधनाचा हा पहिलाच प्रसंग आहे. आणि मृत्युपुढें कोणाच्या नाड्या आखडणार नाहींत ? हा अपमृत्यु टळता तर रावसाहेबांना किमानपक्ष परिषदेचं कार्य आटोपेपर्यंत तरी जगण्यास मरण नव्हतं. रावसाहेबांना प्रत्यक्ष मरण येतं तर इतकं वाईट वाटण्याचं कारण नव्हतं. परंतु त्यांच्या अपमृत्यु-मुळेंच मरणप्राय दुःख होतें. जन्मतःच त्यांची प्रकृति अक्षय रोगग्रस्त; त्यात क्षयानें त्यांच्या आयुष्याचा अखेर व्हावा याबद्दल कोणाला दुःख वाटणार नाहीं ! त्यांचें स्वतःचें ग्रहमान मरणयोग दर्शवीत होतें; तथापि पत्नीच्या पत्रिकेवरून तिला वैधव्ययोग नाहीं असं एका नामांकित ज्योतिषानें त्यांना सांगि-तल्यापासून अलिकडे त्यांना बरीच हुशारीहि वाटूं लागली होती. पत्नीच्या पत्रिकेंत पुनर्विवाहाचा योग आहे हें ज्योतिर्विदांच्या लक्षांत न आल्यामुळें अखेर होऊं नये तें झालं. योगायोग असा कीं याच वेळीं मला विधुरावस्था प्राप्त होऊन रावसाहेबांच्या घराण्याचा संबंध अशा प्रकारें जुळून येऊं पहात आहे ही ईश्वरी लीला पाहिली कीं कंठ सद्गदित झाल्यावांचून कसा राहील ?

या परिषदेची मूळ कल्पना रावसाहेबानींच काढली ! परंतु पुढें असें होणार ही काय कल्पना? या कामीं रावसाहेबांना अविश्रांत श्रम करावे लागले आणि ते त्यांच्या प्रकृतीला न मानवून आपल्या सन्माननीय स्वागताध्यक्षांचें मृत्यूनें स्वागत

करावं याहून विपरीत तें काय ? जगापुढें येण्याची ही संधी, नाव अजरामर होण्याचा हा योग, वाया जाऊन रावसाहेबांना उलट जग सोडून मरणवश व्हावं लागलं. माझ्यानें आता अधिक बोलवत नाहीं; तथापि त्यांचं कार्य मी पुढें चालवीन इतकें सांगून मी खालीं बसतों."

ठरावः—"संगीतांतील शृंगारिक चिजांचा ही परिषद जाहीर रित्या तीव्र निषेध व्यक्त करीत आहे."

या ठरावावर भाषण करतांना दे. भ. बोलघेवडे म्हणालेः—

"शृंगारासारखा एकांतानुकूल रस सार्वजनिक रीत्या प्रगट करून उच्छृंखल भावना उद्दीपित करणं गर्हणीय होय ! यामुळें गायनश्रवणाकडे अवश्य तें लक्ष लागणं दुरापास्त होऊन पुष्क-ळांना गाण्याच्या मैफलींतून उठून घरीं जाण्याचा प्रसंग याच कारणास्तव येत असावा हें मी स्वतःच्या अनुभवावरून सांगूं शकेन. अविवाहित तरुणांची अथवा तरुण विधुरांची काय अवस्था होत असेल याची कल्पना करावी. आजकाल नाटक सिनेमांत तर शृंगाराला ड्रॉपचाच काय तो आडपडदा राहिलेला आहे. आपल्या देशांत वीररसाला अवसर नसला तरी करुणरस वाटेल तवेढा आळवितां येण्यासारखा नाहीं काय ? कडेकोट बन्दोबस्तानें बुरख्यांत साठवल्या जाणाऱ्या स्त्रीसौंदर्याची उघडपणें विटंबना करणें हा आपला आर्यधर्म नव्हे. अलिकडे तर स्त्रीवर्गालाहि हें संगीताचं वेड लागलेलं पाहून वेड्यासारखं होतं. या बाबतींत मी इतकी दक्षता बाळगीत असतांहि

" मला मदन भासे " या पदानें माझी गृहस्थिति बिघडून टाकलेली आहे. फोनोग्राफची शृंगारिक रेकॉर्ड्सूच अधिक विकली जातात; यावरून आपल्या समाजस्थितीची काय कल्पना करावयाची ?

ठराव:—"काव्य गायनाचा प्रसार जोरानें करण्यांत यावा"

हा ठराव पुढें मांडतांना काव्यसम्राट म्हणाले:—

" काव्यगायनाचं श्रेष्ठत्व जर कशांत असेल तर तें कवीच्या स्वयंस्फूर्तीमध्येंच होय. गावें म्हणून कवि गात नसून त्याला गावेसें वाटतं म्हणून तो गातो. गायक मात्र उलट गाण्याकरितांच गात असतो, गायक स्वतः कवि नसतो. गायकांना दुसऱ्याच्या काव्यासाठीं तोंड वेंगाडावं लागतं. संगीतज्ञाला साथीची गरज असते. कवि कोणत्याच साथीला जुमानीत नाहीं. गायकी गाण्याला श्रोता समजदार असावा लागतो. काव्यगायन वाटेल त्याच्यापुढें करतां येतें. खानदानी गाण्यांत अर्थप्राप्तीऐवजीं अर्थहानीच होते. कवि देवासारखा स्तुतिप्रिय असल्यामुळें त्याला चहाचा नैवेद्य अथवा विडीची उदबत्ती पुरेशी होते. सारांश काव्यगायनाची महती दृष्टिआड करतां येण्यासारखी नाहीं. हें लक्षांत घेऊन काव्यगायनाचा प्रसार करण्यासाठीं एक फंड उभारण्यांत यावा. कविप्रचारक-मंडळाचा खर्च या फंडांतून व्हावा. ठिकठिकाणीं काव्यगायनाच्या शाळा स्थापण्यांत याव्यात. या फंडाच्या व्याजांतून कवींना लागणारें लेखनसाहित्य पुरविलं जावं. कल्पनेबाहेर फंड जमला तर

काव्यग्रंथसंग्रहालयाची कल्पना हातीं घेण्यासारखी आहे. कवि हे जन्मतःच कांहींसे वेडे असतात. हें वेड वाढण्याचाहि संभव असल्यामुळें उरलेल्या फंडांतून कवीसाठीं स्वतंत्र वेड्याचें इस्पितळ बांधण्यांत यावं इतकं कवींना अवश्य तें उत्तेजन मिळेल तर काव्यगायनांचे जलसे करून हां हां म्हणतां फंड जमवितां येईल. काव्याचा ज्याला कंटाळा असेल तो देखील काव्यगायनाच्या कंटाळयामुळेंच फंडाला द्रव्यद्वारा मदत करून ताडकन मोकळा होईल. "

या ठरावाला विरोध करतांना प्रो. तुंबर म्हणालेः—

"मी या ठरावाला विरोध करणार आहे; करणार आहे—म्हणजे काय केल्यावाचून राहणार नाहीं, आणि रहाणार नाहीं म्हणजे करीतच रहाणार. स्वतःचं काव्य दुसऱ्याला जबरदस्तीनं ऐकविण्याचं कवींचं जन्मसिद्ध वेड याच्या बुडाशीं आहे दुसरें काय? दुसरें काय म्हणजे दुसरं तिसरं कांहींच नाहीं. प्लेगाची गांठ पुरवली पण या कवींची गांठ महातापदायक होय. होय म्हणजे काय मृत्यूनें प्लेगच्या तापांतून मुक्तता तरी होते पण कवींच्या तापाला मुदतच नसते. नसते म्हणजे काय नाहींच. पूर्वीच्या कवींनीं कधीं काव्यगायन केलं आहे का? आहे का कशाला, नाहींच. आपण गायक नसून कवि आहोंत हें ते पूर्णपणें जाणत होते. जाणत होते म्हणजे ते चांगले जाणतेच होते. "चंद्रकांत राजाच्या राणीची" चाल कशी आहे हें वृत्त मयूरकवीला माहीत नसेल असं

नाहीं; परंतु त्यांनीं आर्येखेरीज इतर छंद सहसा केलाच नाहीं. केला नाहीं म्हणजे काय त्यांना करता आला नसता असं नाहीं; परंतु नाहीं म्हणजे नाहीं. ज्याला सूर ना ताल असलं गायन कवींनींच करावं. करावं म्हणजे खरं म्हटलं तर करूंच नये. तथापि कोणी करूं लागला तर त्याला कोण काय करणार ? काय करणार म्हणजे काय, त्याचा प्रतिकारच केला पाहिजे. गायन म्हणजे कांहीं थट्टा आहे कीं काय ? काय म्हणजे काय ? हाडाचीं काडं करावीं तेव्हां कुठं स्वरसाधन होतें. म्हणजे काय एखाद्याला होत देखील नाहीं. नाहीं म्हणजे मी मी म्हणविणारांना हात टेकावे लागले आहेत. ”

ठरावः—“ रागदारीला काळवेळाचा प्रतिबंध नसावा. ”

या ठरावावर बोलतांना इतिहास संशोधक पु. रा. विध्वंस म्हणालेः—

“ या प्रश्नाकडे कित्येक दिवस माझं लक्ष वेधून राहिलेलं आहे. आपल्याकडील संगीताखेरीज कोणत्याहि देशांतील इतिहांसात असलें रागदारीचें बंधन आढळत नाहीं. अमक्या-वेळीं अमुकच राग कां गावा याची संगतीहि अद्याप कोणीं समाधानकारक लावलेली नाहीं. रात्रीच्या प्रहरीं एखाद्यानें सारंग रागांतील चीज म्हणावयास सांगितली तर गायकाला किती राग येतो याचा मला प्रत्यक्ष अनुभव आहे. यामुळें एका मैफलींतून मला उठून जाणं भाग झालं. वास्तविक संगीतज्ञांच्या या बेताल रागालाच आळा घालणं अवश्य आहे.

गांठचे पैसे खर्च करून चार चौघांना स्वतःचं हंसं करून घेण्यापेक्षां गाण्याला जावयाचंच नाहीं असा मला निश्चय करावा लागला. सात स्वर ते काय, त्यांत करून करून फेर फार तो काय व्हावयाचा आणि त्याला आणखी काळवेळाचीं बंधनं हें सर्व खूळ नव्हे तर काय ? एकाच मैफलींत वाटेल ते राग न ऐकवितां, तेवढ्यासाठीं वेगवेगळया बैटकी व्हाव्यात ही केवळ गायकांची धंदेवाईक उस्तादगिरीच असली पाहिजे असं माझं ठाम मत आहे. रात्रीचा राग दिवसा अथवा दिवसाचा रात्रीं गायल्यानें काय बिघडतं हें मात्र कोणी सांगूं शकत नाहीं. असल्या जुलमाचं उदाहरण इतिहासांत देखील सापडायचं नाहीं. ज्याला रात्रीचं जागरण सोसत नसेल किंवा घरांत कोणी सोबत नसेल अथवा अन्य कांहीं अडचणी असतील त्यानें रात्रीचे राग कोणत्या वेळीं ऐकावयाचे ? रात्रीचा दिवस करून थकल्या भागलेल्या श्रोत्यांना दिवसाचा राग रात्रीं ऐकविण्यास काय अडचण आहे ? खरं म्हटलं तर गाणीं ऐकण्याला वेळ तरी आहे कोणाला ? त्यातल्या त्यांत वेळ काढावा तर असल्या भानगडीमुळें श्रोत्यांचा किती विरस होतो हें त्यांचं त्यांनाच माहीत ! दीपरागानें दिवे लागल्याचा प्रत्यय आजकाल कोणालाच नाहीं. पूर्वी काय दिवे लागले असतील ते असोत. मेघमल्हारानें पर्जन्यवृष्टी होती तर एकही दुष्काळ न पडतां गायकावर पुष्पवृष्टी झाली असती. "

ठरावः—'संगीताचें मराठीकरण' करणें अपरिहार्य आहे."

हा ठराव पुढें मांडतांना ह. भ. प. पाखांडेश्वर बोआ म्हणाले:—

" या विषयाकडे मोठमोठ्या विद्वानांचं व संगीतरत्न गायकांचं लक्ष वेधून राहिलं आहे, यावरून संगीतकलेचा भाग्योदयकाल समीप आला असंच मी समजतों. आजपावेतों झालेली अर्थहानी आतां भरून निघणार यांत शंका नाहीं. याबाबत कांहीं विरोध दिसून येत असला तरी आक्षेपकांना काव्याची महती, अर्थाची व्याप्ती आणि भाषाभिमान यांचं महत्व समजलेलं नाहीं हेंच खरं. व्यवहारांत देखील अर्थाकडे दृष्टी ठेवून वागलं नाहीं तर अनर्थ होतो. मी तर म्हणतों, संगीतज्ञांनीं प्रथम अर्थशास्त्र शिकणं अवश्य आहे. कीर्तनासाठीं मी कांहीं हिंदी चिजांचें मराठीकरण केलेलीं पदें श्रोत्यांना इतकीं प्रिय झालीं आहेत कीं त्यामुळें माझी अर्थप्राप्ती निर्विवाद वाढत्या प्रमाणांत आहे.

ठराव:—" संगीतामधील तालांचें बंधन काढून टाकण्यांत यावें. "

या ठरावाला पुष्टी देतांना कविवर्य "शृंगी" म्हणाले:—

संगीतांत तालाइतका विपर्यस्त प्रकार दुसरा नाहीं असें म्हटलं असतां चालेल. गाण्यातील काव्यभावनेंत तद्रुप झाल्यावर तालाचं भान राहिलं तर भावनाच कसली! गायनगुणानें वृत्ती बेताल होऊं नये म्हणून पूर्वींच्या छंदिष्ट गायकांवर घातलेल्या बंधनाची आजच्या सुशिक्षित जगांत काय गरज

आहे ? दुसरं असं कीं लय या शब्दाचा अर्थ नाश असा पण होत असल्यामुळें हा हानिदर्शक शब्द संगीतामध्यें नांवालाहि असणं इष्ट नाहीं. आज जातिभेद मोडून टाकण्यांत येत आहेत हें लक्षांत घेऊन तालांमधील भेदही नष्ट करणं उक्त आहे. काव्याचीं बंधनें शिथिल केल्यामुळें आज वाटेल तो मनुष्य वाटेल त्या विषयावर काव्य करण्यास समर्थ होऊं शकतो. कलाविषयांत नीति अनीतीच्या प्रश्नाला धाब्यावर बसविणारे खुशाल वाटेल तें म्हणोत. परंतु माझं म्हणणं असं आहे कीं संगीतासारख्या पवित्र विषयांत चर्मवाद्य निषिद्धच मानलं पाहिजे. तबला, पखवाज, खोड नाहींसे झाल्याखेरीज थापा मारण्याची खोड मोडणार नाहीं. पखवाजाला लागणारा आटा गायकाच्या पोटांत जाईल तर तें अधिक श्रेयस्कर असून असं केल्यानें पखवाजाचं तोंडही बंद होईल. शिवाय तबला पखवाजाचे बोल अर्थशून्य असल्यामुळें हा प्रकार भावनाप्रधान होऊं शकत नाहीं. सर्व बाजूंनीं विचार केला असतां तबला पखवाजाच्या चार्टीला चाट देणं अवश्य आहे. "

या भाषणाला विरोध करतांना उस्ताद "गदिगनखा" हे आपल्या मोडक्या तोडक्या भाषेत म्हणाले:—

"आभी तो खाली एक पखवाजिया असतो. बाता करनेकी आदत आमाला नाहीं. "शृंगी" साब तो मोट्टा कवि और बडा लिखनेवाला ए मलावि मालुम है. फिर गाना बजाना क्या चीज है और इसमे कितना दिमाख रहता है

इकडे थोडा लक्ष तो दिवायला हवाः खाली बगबग करायची आ तो आजका जमानाही है. फिर ओ विषयमें ज्यो कुच्र करना पडता है ओ बातोसें बिलकुल अलग है. इच्यामध्यें केवढा कष्ट कराला पडतो इसका कविसाबकु पताबि नैं. जिसकु लय बोलाण्यामदे येते ओ काबिज करना बडी मुष्किल कि बात है. और इसमे ज्यो आनंद पैदा होऊनशनि राहतो तो बस्स औरई है. मला सगला तो कोई भाषण समजते नै. थोडा कुच्र ध्यानामंदी आला ते देखनेसे माझी अक्कलबि त्याच्यापुढें च्यालू शकते नाहीं. मेरा कहना इतनाच है कीं गानाबजाना और ओ समजना पंडितका काम नहीं. समजदार अदमी बिगर येच्यामदे कोनिबि बोलना ओ काम अच्छा नहीं. और येच्यापासुन घुस्सा करन्याची पण कारन नहीं. "

या ठरावासंबंधीं पुढील उपसूचना करतांना वे. शा. सं. लंबोदरशास्त्री म्हणाले:—

" वादे वादे जायते तत्वबोधः " या बोधवचनान्वयें उभयपक्षीयांच्या भाषणांचा विग्रह केला असतां इत्यर्थरूपानें असं प्रत्ययास येतं कीं, उस्ताद " गादिगनखां " यांच्या स्पष्टीकरणांत ग्राह्यांश असून कविवर्य भृंगी यांनीं अर्थाला प्राधान्य द्यावं अर्थातच अन्यथा नव्हे ! तथापि उभयान्वयी वादांतून एक तोड, बिनतोड अतएव विचारणीय वाटते ती उपसूचनेच्या द्वारा प्रदर्शित करण्याची मनीषा मी व्यक्त करीत आहे.

"संगीताचें मराठीकरण" होणं वर्तमानकाळीं अपरिहार्य झालं असतां, अशा समयीं पखवाजाचं अर्थीकरण केल्यानें ह्या वाद नामशेष होऊन दुग्धशर्करा न्यायानें उपरिनिर्दिष्ट संयोग मधुर व पौष्टिक झाल्याविना रहाणार नाहीं.

बहुत कालाच्या दीर्घोद्योगानें मी यांत अल्पांशानें यश संपादन केलं त्याचं दिग्दर्शन करण्याचा समय यावा या व्यतिरिक्त धन्यता ती कोणती ?"

असें म्हणून लंबोदरशास्त्री यांनीं उदाहरणादाखल झुंबरा-तालाच्या ठेक्याचें त्यांनीं केलेलें रूपांतर हातानें ताल देऊन पुढील प्रकारें म्हणून दाखविलें:—

"प्रथम मूळ ठेका अवलोकून तदनंतर मी रचलेला बोल श्रवण करणं ग्राह्य होय. झुंबरातालाच्या चौदा मात्रा मोजून उस्ताद गदिगनखांनीं ताल द्यावा असं मी सुचवतों.
"**धिंऽ** धातरकड **धिं** धिं धागे तिरकिड तिंऽतातिरकिड **धिं** धिं धागेतिरकिड ( **धिं** )."

सज्जनहो, आतां माझ्या रूपांतराकडे सावधानचित्त द्या हीच प्रार्थना. माझें रचनावैशिष्ट्य हेंच कीं ते कविवर्य केशवसुतांच्या प्रतिभासंपन्न "झपुर्झा"च्या घाटाचं असून त्यांत शृंगाराचा लवलेशही नसल्यामुळें तें मुलामुलींनीं निःशंक ग्रहण करावें.

"**झिम्**ऽझ्यापोरि **झम्** झिम् झिम्मा खेळुं छुम् झपुर्जा छुम् झ्या झ्या पोरि ( **झिम्** )"

गुणिजनहो, लक्षणगीताप्रमाणें या ठेक्यांतील "झकार" झुंबरा नात्राचा कसा झणत्कार करीत आहे हें आपल्या ध्यानीं येईल. एतद् प्रकारें सर्व तालांच्या ठेक्यांचें व बोलांचें अर्थीकरण प्रकाशित करण्याचा समय सन्निधच्च आलेला असल्यामुळें स्थलकाल संकोचास्तव मी आपला अधिक वेळ अपाहार करूं इच्छित नाहीं."

यांपैकीं बहुतेक ठराव बहुमतानें पास होऊन सभेचें काम एका बैठकींतच संपेल असा रंग दिसत होता. रा. ब. शहाणे यांना आराम वाटून अध्यक्ष या नात्यानें समारोपादाखलचें अखेरचें भाषण करण्यासाठीं ते सभास्थानीं यावयास निघाल्याची वर्दी येऊन पोहोंचली होती. बहुतेक ठराव पसार झालेले पाहून संगीतज्ञ मंडळीहि एकामागून एक पसार होत गेल्यामुळें मेज-वानीच्या बेताची शेलकी मंडळीच काय ती त्याच आशेनें कीं काय तिष्ठत बसलेली होती. रावबहादुर अर्ध्या वाटेवर आले असतील नसतील तोंच क्षणार्धात आकाश मेघांनीं व्याप्त होऊन गेलें. सूर्यास्त नुकताच झाला होता. त्यांत आणखी मेघाच्छादित आकाशामुळें सर्वांचे डोळे आकाशाकडे लागले असले तरी काळोखा खेरीज कांहींच दिसेनासें झालें होतें. अधिक वाट पहाण्यांत अर्थ नाहीं असें वाटून जो तो जाण्याच्या तयारींतच होता. सभास्थानीं रावबहादुर येऊन दाखल व्हायला आणि जोराची पर्जन्यवृष्टी व्हायला एकच गांठ पडली. हां हा म्हणता पावसानें हाहाःकारच उडवून दिला. असल्या मुसळधार पाव-

सांतून व काळोखांतून घर गांठणें अशक्यप्रायच होतें. "थांबा, घाबरूं नका," असें मोठ्यानें ओरडून विद्यावाचस्पति सांगत होते खरे, परंतु त्यांच्या तोतऱ्या भाषणाचीहि बोबडी वळून गेल्यामुळें "थ थ थ, ब ब ब," या कर्णोच्चाराखेरीज त्यांतून कांहींच बोध होण्यासारखा नव्हता. रावबहादुरांना दोघां तिघांनीं घट्ट धरून ठेवलें होतें, "मला कसंहीकरून घरीं पोचवा हो," असें ते मधून मधून विनवून सांगत, परंतु त्यांच्या बोलण्याकडे कोण लक्ष देणार ? जो तो स्वतःचा जीव कसातरी संभाळीत होता. इतक्या अवधींत पर्जन्यवृष्टी किती झाली हें कळण्याला मार्ग नसला तरी जवळच्या नदीला पूर येऊन परिषद तरंगूं लागली. पसार झालेले ठराव पाण्याच्या प्रवाहात अधिक पसार होऊं लागले. सर्वांनाच पोहता येत नसल्यामुळें बुडणारांची स्थिति शोचनीय होऊन गेली. यांत कांहीं कविवर्यही होते. "मृत्यूच्या मुखांत" ह्या नमनाच्या कवितेंतच अखेर होण्याचीं लक्षणें स्पष्ट दिसूं लागलीं. रावबहादुरांचें बोलणें बंद झालें, यावरून त्यांना फिट आली असावी असें सर्वांना वाटूं लागले. दे. भ. बोलघेवडे पाण्याच्या लोटानें घाबरून केव्हा केव्हा किंचाळतांना ऐकूं येत. प्रो. तुंबर आलापांत विव्हळतच होते. मधून पाउस थांबतो असें वाटून जिवात जीव यावा तोंच अधिक उसळीनें तो कोसळूं लागला म्हणजे एकच हाःहाःकार उडून निरनिराळ्या इष्टदेवतांची नांवें ऐकूं येत. गावातील लोक येतील ही आशा पण नष्ट होत चालली. पुढें पुढें धावा करण्याइतकाही

कोणाच्यांत जीव राहिला नाहीं. असें पाहूनच कीं काय परिषदेच्या पुण्याईनें पाउस बंद होउन हळूहळू पाणी पण ओसरत चाललें. गांवांतील मंडळी पाउस केव्हां थांबतो याची वाटच पहात बसलेली होती. पूरही कमी होत चाललेला पाहून पांचपन्नास मंडळी सभास्थानीं यावयास निघाली. त्यांत कांहीं डाक्टरांनींहि मनावर घेऊन मागेंपुढें पाहिलें नाहीं. मामलेदारसाहेबांनीं संकटग्रस्तांना नेण्याची पूर्व तयारी करून ठेवली होती. आकाश निरभ्र होऊन चांदण्याचा प्रकाश पडूं लागल्यामुळें साह्यकारी मंडळींना उजेडाची अडचण पडली नाहीं. मोठ्या झपाट्यानें पल्ला गाठून सभास्थानीं सर्व मंडळी येऊन पोहोंचली. सभासद शोचनीय स्थितींत इतस्ततः पडलेले दिसून आले. कांहीं मंडळी प्रथम रावबहादुरांचा शोध करूं लागले. अध्यक्षस्थानाच्या दगडाला विळखा घातलेल्या पुष्पहारांत रावबहादुरांची मान अडकून ते पडले होते. विद्यावाचस्पति उताणें झालेले असल्यामुळें त्यांना कोणी लवकर ओळखूं शकला नाहीं. "शृंगी भृंगी" परस्परांना मिठी मारून पडले होते. दे. भ. बोलघेवडे विव्हळत, तर कोणी कण्हत असल्याचे पाहून सर्वांच्या अंगावर कांटा आल्यावाचून राहिला नाहीं. रावबहादुरांच्या नाकातोंडातून पाणी गेल्याचें स्पष्ट दिसून आल्यामुळें त्यांना दोघां तिघांनीं गरगर फिरवून ओकाला लावलें. विद्यावाचपस्तींच्या नाड्या आखडत चाललेल्या पाहून डॉक्टरांनीं त्वरेनें त्यांना योग्य इंजक्शन

दिलें. अशा प्रकारें सर्वांना निकर्डीचे औषधोपचार करून कोणाला हॉस्पिटलमध्यें तर कोणाला घरीं पोंचविण्यांत आले. रावबहादुरांची स्थिति चिंताजनक दिसते, परंतु डॉक्टरांचे जारीचे उपाय चालू असून लवकरच सर्वांना आराम पडेल असें डॉक्टरांच्या कमिटीचें मत आहे. परिषदेचा शेवट गोड होणार असें अनुमान करण्यास हरकत नाहीं.



# इश्श्य

" ईश " व " इश्श्य " शद्बांतील वर्णसाम्य पाहिले कीं " इश्श्य " हा ईशस्वरूपाचा अधःपात असावा असें वाटल्यावांचून रहात नाहीं.

तसेंच या उद्गारवाचक सर्वनामाचें अनादित्व आणि स्त्रीप्रिय प्रकृतीवरून असेंही अनुमान होतें कीं, या शद्बाची उत्पत्ती साक्षात् आदिमायेच्या मुखांतून झालेली असावी.

ॐ या प्रचंड ब्रम्हाण्ड ध्वनीनें देखील शेषशाई भगवानाची झोप उघडत नाहींसें पाहून त्यांना जागे करण्यासाठीं आदिमायेनें भगवानांची शेंडी धरून, भेदरलेल्या कंपित स्वरानें " ईश ! " " ईश " ! म्हणून हाका मारतां मारतां, उच्चाराच्या द्रुत गतीतील धक्यानें " ई " व " श " च्या शेंडीची गुंतागुंत झाली असावी; आणि रामनामाच्या " मरामरा " या विपर्यस्त प्रकाराप्रमाणें "ईश" संबोधनाचा "इश्श्य" असा दुर्बोधित ध्वनी प्रथम पार्वती देवीच्या कानीं पडला असण्याचा संभव आहे !

पतिदेवाला अपशद्ब बोलण्याचा पतिव्रताधर्म नसल्यानें ही उणीव " इश्श्य " शद्बानें भरून निघाल्यासारखी गिरजा देवीला वाटली असेल यांत शंका नाहीं. तथापि भोलानाथांच्या दिगंबर वृत्तीपुढें हें इश्श्यही मेल्यासारखें होऊन अखेर " इश्श्य मेलं " म्हणण्याचा प्रसंग पार्वती देवीवर आला असला पाहिजे !

*

याचा परिणाम गर्भावस्थेंतील बालकावर होऊन ते वक्रतुंड झाले; पुढें बापसे बेटा सवाई या न्यायानें अष्टौप्रहर ऋद्धीसिद्धींना मांडीवर घेऊन बसण्याच्या गजकर्णाच्या शोक कंडूला कंटाळून त्या दोघींनी " इश्श्य " शब्दाचा केलेला भडिमार देवलोकीं सर्वतोमुखीं झाला असावा !

" इश्श्य " शब्द कानीं देखील पडूं नये म्हणून स्वतःला कोंडून घेणं कार्तिकस्वामीना भाग झालं असावं !

ब्रह्मकुमारीनें, पित्याच्या चारी तोंडाला काळिमा लावणाऱ्या नीच वृत्तीला " इश्श्य " शब्दानें धिक्कारलें असेल यांत शंका नाहीं !

नारदमुनी सारख्यांना ग्रहस्थाश्रमाची दुर्बुद्धी आठवून ते नारदी होतांच " इश्श्य ! हें काय भलतंच " असे विस्मय-चकित उद्गार त्यांच्या रूपांतरित स्त्रीमुखातून निघाल्यावांचून राहिले नसतील !

सीतादेवी सारख्या पतिव्रतेबद्दल प्रभु रामचंद्राच्या हलक्या कानांनीं घेतलेला संशय निःसंशय इश्श्य म्हणण्यासारखाच होय !

ब्रह्मचारी हनुमानाच्या निढळया घामानें गर्भवती झालेल्या मगरीला "इश्श्य बाई" असं बोलता आलं नसेल इतकंच काय ते !

देवेंद्राचें कुटिल कारस्थान लक्षांत येतांच गौतमपत्नी " इश्श्य " म्हणाली नसेल असं नाहीं; परंतु तेव्हांपासून " इश्श्य " शब्दाचा अर्थ काहींसा बदलत चालला असावा !

## स्वल्पविराम

कृष्णावतारी गोपाळकृष्णाच्या शृंगारचेष्टेपुढें असंख्य गोपींना "इश्श्य" हा शद्ब होकारदर्शक नकार म्हणून उच्चारणें भाग झालें असले पाहिजे !

पाश्चिमेकडेही या शब्दाचा फैलाव "इश्श" अशा उद्गारांत झाला असून तो त्याच्यामधील रूढ चुंबनाचा प्रत्याघात असावा असें वाटतें !

अशा प्रकारें "इश्श्य" या किळसदर्शक शब्दांतही मुग्धमाधूर्य उत्पन्न होऊन, वर्तमान कालीं तो प्रणयी जीवांना वेड लावण्यास समर्थ व्हावा यांत नवल तें काय ?



# विठ्ठलपंतांची मुलाखत

चवताळलेला वक्ता, श्रोतृवृंदाच्या अभावीं पिसाळून जावा; उतावळा घोडवर, वरघोडा पाहून बेफाम व्हावा, आरशांतील प्रतिबिंबावर, कुरूपसंपन्नानें दांत ओठ खात बसावें; अथवा 'अतं[illegible]च्या जाहिरातीकडे पाहून क्षयरोग्यानें झुरावें.' अशी कांहीं विलक्षण भिन्न भिन्न प्रकारची स्थिति विठ्ठलपंतांची झालेली होती.

राजकरणाचा विचका होत आहे असें विठ्ठलपंतांना वाटून ते चवताळून जात. शिक्षणसंस्थांकडे पाहून त्यांना उन्माद चढे! आपण पुढारी कां होऊं शकलों नाहीं या कल्पनेनें त्यांच्या जिवाचा जळफळाट होई. आणि वृत्तपत्रांतून प्रकाशित होणाऱ्या देशभक्तांच्या छायाचित्रांच्या दर्शनानें ते दिवसेंदिवस खंगतही चालले!

अनेक विचारांची निपज, ठेवणाऱ्या विणीप्रमाणें झपाट्यानें वाढत जाऊन, रक्तप्रवाह मस्तकाकडेच खेचूं लागल्यामुळें विठ्ठलपंतांच्या कृश होत चाललेल्या शरीरयष्टीला डोक्याचा वाढता बोजा झेपेनासा झाला!

दूध उतूं जाण्याच्या बेतास यावें, किंवा रबराचा फुगा टरटरूं लागावा त्याप्रमाणें विचारांचा स्फोट होऊन डोकें फाटून

जातें कीं काय या भीतीनें, कानटोपीवर गळपट्टावजा बाल-पणांतील लंगोट विठ्ठलपंत करकचून बांधून घेत. तरी देखील दिवसेंदिवस डोक्याचा आकार कल्पनेबाहेर वाढत चालला. असलें डोकेबाज गिऱ्हाईक संभाळण्यांत उलट स्मश्रुकाराचीच हजामत होऊं लागल्यामुळें, तो ठराविक दरांत विठ्ठलपंतांना केसविमुक्त करण्यास वस्र्याप्रमाणें कुरकुरु लागून अखेर विठ्ठल-पंतांनाच स्मश्रुकाराच्या दाढीखालीं हात घालण्याचा प्रसंग आला ! आज घातलेलें पागोटें चार दिवसानंतर डोक्यावर बसत नाहींसें होऊं लागल्यामुळें पाश्चिमात्यांच्या हॅटप्रमाणें पागोट्याला हनुवटपट्टा अडकविणें अपरिहार्य झाल्यावांचून राहिलें नाहीं !

हें सर्व वेडाचें पूर्वचिन्ह आहे असें ठरवून त्यांच्याकडे जाणेंहि सर्वांनीं वर्ज्य केल्यामुळें विठ्ठलपंताची अधिकच शोच-निय स्थिति व्हावी यांत नवल तें काय ? नाहीं म्हणायला वाटेल तें ऐकून घेण्याला तयार तसा एकच काय तो श्रोता ! तो म्हणजे विठ्ठलपंतांचें कुटुंब. परंतु पत्नीच्या बहिरेपणापुढें विठ्ठलपंतांचें वक्तृत्व मुकें पडून ते कासावीस होत !

डोक्यांतील असह्य झालेल्या विचारांचा बोजा कागदावर उतरून मोकळें व्हावें तर त्यांच्यापुढें दादोबा पांडुरंग उभा राही. पांडुरंगाच्या कृपेनें बोलावें कसें हें विठ्ठलपंतांना अवगत होतें, परंतु दादोबा पडला व्याकरणाचा कर्ता-त्याच्यापुढें विठ्ठलपंतांचें कर्म आडवें पडल्यामुळें शाळेतून क्रियापद काढणें भाग झालें.

पुढें त्यांना लवकरच वडिलांच्या क्रियाकर्मांतूनही मोकळें व्हावें लागून घरांत विठ्ठलपंतच काय तो कर्ता उरल्यामुळें लिहिण्याच्या बाबतींत त्यांना पूर्णविरामच करावा लागल्यास नवल नाहीं !

सारांश सर्व प्रकारें नाइलाज होऊन या विचारपित्ताचीं वाती होईल तर बरी किंवा कोणी आपली मुलाखत तरी कां घेत नाहीं या प्रश्नांकित दृष्टीनें विठ्ठलपंत एक दिवस ओसरीवरील पडक्या भिंताडावर बसून आकाशाकडे पहात असतां, आकाशस्थ देवालाच दया येऊन कीं काय, कोणी खाकरून शिंकरल्याचें त्यांच्या डाव्या कानीं पडलें !

समाधी उतरून ते इकडे तिकडे पाहातात तों "मुलाखत" या एकांतराड दैनिकाचे संपादक श्रीयुत " छापखाने " त्यांच्या दृष्टिपथांत आल्यावांचून राहिले नाहींत. संपादकमहाशयांचा चेहरा पायका टाइप असला तरी शरीरसंपत्ति रूळासारखी असल्यामुळें वृत्तपत्राच्या मथळ्याप्रमाणें ते अदूरदृष्टींतही चटकन् भरत !

या अपूर्व दर्शनानें झालेला आनंद व्यक्त करण्यासाठीं विठ्ठलपंतांनीं वाढत्या आतुरतेनें भिंताडावरून उडी घेतली. हा धक्का पडक्या भिंताडाला पुरा पाडता झाला ! संपादक महाशयांनीं धांवत जाऊन थडगस्त झालेल्या आत्म्याला सदेह बाहेर काढतांना शीरसलामत निघणें मुष्कीलीचें झाल्यावांचून कसें राहील ?

क्षणार्धांत या अपघाताचें भान विसरून जणुं कांहीं झालेंच नाहीं असें मोठ्या कष्टानें दाखवीत विठ्ठलपंतांनीं श्री. छापखाने यांचें स्वागत केलें, " आज इकडे कुठें ? " अशा अर्थाचा नेत्रभाव करून ते उभयतांहि स्थानापन्न होतांच श्री. छापखाने बोलूं लागलेः—

" तें-असं-झालं, आपले रावसाहेब घोडे-माहितच आहेत तुम्हांला-मोठे शौकी आहेत शर्यतीचे-म्हटलं त्याची तरी मुलाखत घ्यावी. म्हणून उजाडतच घराबाहेर पडलों-त्यांच्याकडे चहा घ्यायचाच म्हणून तसाच निघालों झालं. परंतु रावसाहेबांकडे येऊन पहातों तों काय-त्याची अत्यावस्थ स्थिति झालेली—परवांच म्हणे घोड्यावरून पडले ते काय-आणि आज पहावं तों ही स्थिति ! मृत्युलेख लिहिण्याच्या घाईनं परतच फिरावं लागलं काय ? मुलाखत नाहीं तरी मृत्युलेख देण्याची संधी मिळून नुसताच हेलपटा नाहीं पडला म्हणायचा ! एव्हांना मेले देखील असतील ! "

विठ्ठलपंतांच्या अधीर वृत्तीला रावसाहेब घोडे एकदा सोडून सातदां मरते म्हणून त्यांच्याशीं काय करावयाचें होतें ? कांहींशा तिरस्कारयुक्त स्वरानें ते म्हणालेः—" न मरायला काय झालं ? नांवाच्या घोड्याला गोळी घालून मारीत नाहींत एवढं ठीक. गाढवासारखं घोड्यावर बसावं कशाला अगोदर ? बसायचं होतं तर गादी खुर्च्या काय थोड्या होत्या लोकांकडे ? भिंताड पडेल अशी माझी कल्पना असती तर अशी घोड्याइतकी

चूक मीही करतों ना. तें राहूं दे—पण—आपण आज घोड्यांच्या निमित्तानेंच पायधूळ झाडलीत म्हणायची ? " " तसंच केवळ नाहीं—बरेच दिवसांत आपली भेट पण नव्हती—आणि गंमत काय झाली—वाटेंत—झाली चहाची आठवण—आठवण कसली तलफच ती—घरीं जाई तों धीर थोडाच धरवणार—म्हटलं--चला आतां—विठ्ठलपंतांनाच गांठूं या—" असें म्हणत संपादक महाशयांनीं आपला हात टाळीसाठीं पुढें केला.

हें भलतेंच लचाड उपस्थित झालेलें पाहून विठ्ठलपंत इतके चवताळून गेले होते कीं ते दुसऱ्या एखाद्याच्या मुस्कुटांतच देते. परंतु " मुलाखत " पत्राचे संपादक ही गोष्ट त्यांना विसरतां येईना. अंतर्यामीं ते किती पिसाळलेले होते याची जाणीव संपादकानीं टाळीसाठीं पुढें केलेल्या हातालाच काय ती झाली असावी. कारण संपादक महाशयांना आपला हात बराच वेळ कुरवाळावा लागला! बिघडलेली चेहेरेपट्टी स्थीरस्थावर करीत विठ्ठलपंत आपुलकीचा स्वर आणून म्हणाले,

" वा !—म्हणजे–हे–हें–काय विचारता—घर तुमचं आहे—आणखी काय ? "

वस्तुतः विठ्ठलपंत छापखान्यांच्या घरांतच रहात होते आणि घरांत " आणखी तें काय " असणार हें त्यांना माहित नव्हतें असें नाहीं. चहाच कसा होतो या चिंतेंत ते होते. तथापि शिष्टाचारित भाषा बोलल्यावांचून सुटकाच नाहीं.

विठलपंत कोणत्या फिकिरींत आहेत हें त्यांच्या कुटुंबानीं तेव्हाच ताडलें. त्यांना ऐकूं येत नव्हतें इतकेंच काय तें. बाकी एरव्ही त्या कोणाला ऐकायच्या नाहींत. घरांत दुधाचा थेंब, खडीसाखरेचा खडा, किंवा चहाची चुमुट नांवालाहि नसता त्यांनीं हां हा म्हणतां—आणि—न सांगतांसवरतां—चहा आणून दिला !

अर्धांगी असावी तर अशी नाहीं तर अर्धांग वायु झालेला परवडला असें विठलपंतांना, पत्नीची ही हातचलाखी पाहून वाटल्यावांचून राहिलें नाहीं. चहाचा पेला जवळ करीत संपादक म्हणाले, " चहाचं काय मोठंसं—तो काय आहेच नेहमीचा—जिकडे जावं तिकडे चहा—मी तर लिप्टनची एजन्सी घेण्याच्याच खटपटींत आहे—चहाबरोबर कमिशनही लाटतां आलं तर काय वाईट—तुम्ही फार दिवसानीं भेटलां यांत सर्व कांहीं आलं "

चहा कसा काय झाला असेल याचा अंदाज विठल-पंतांना असला तरी औपचारिक रित्या त्यांना काहीं तरी विचारावेंच लागलें.

" काय साखर बिखर बेताची आहे ना ? नाहीं तर आणतों पाहिजे तर ? "

छापखान्यांना येऊं पहाणारी उलटी आवंडा गिळून कशी तरी ते मुलटी करीत आहेत असें पाहून विठलपंत मनात चरकले ! आजच्या चहाचें प्रिस्क्रीप्शन सामान्यतः काय

असावें हें त्यांनीं ताडलें. " लाइम वॉटर, सायरप काकवी, अक्वा प्युरा ही ड्रग्ज संग्रहीं होतींच आणि चहा तयार होण्या-पूर्वीं विठ्ठलपंतांनीं कुटुंबाला परसांतल्या कडुलिंबाच्या झाडाकडे जातांना चुरपुटतं पाहिलें असून चहा पुढें येतांच या Blended Mixture चा फ्लेव्हर त्यांना आल्यावांचून राहिला नाहीं. असला टी शेवटीं उलटी करविण्यास लावतो कीं काय असें वाटून ते म्हणाले:—

" काय माशीबिशी तर नाहीं गेली चहांत ? या माशांनीं तर बेजार केलं आहे अगदीं. घरांत तसं दुसरं तिसरं कारण नसतां, आपल्या वांत्या होऊं लागल्या. अखेर हें माशीचें प्रकरण निघालं. "

संपादक महाशयांना चहाचे असले तऱ्हतऱ्हेचे मासले गिळंकृत करण्याचा चांगला सराव झालेला असल्यामुळें थोड्याच वेळांत उलटीचा जोर नाहींसा होऊन त्यांना उलटी टवटवी येऊन ते बोलूं लागले.

" छेः छेः तसं कांहीं नाहीं. त्याचं कारण आलं माझ्या ध्यानांत. सकाळीं चहा घेऊन निघालों नाहीं म्हणून पित्तांश वाढला दुसरं काय ? चहा पित्ताळ समजतात. परंतु माझ्या प्रकृतीला चहा मिळला नाहीं कीं पित्त भडकतं !! माशीचं काय मोटंसं. परवा—कोणाबरोबरसा, कोठल्याशा हॉटेलांत गेलों होतों. तिथें या माशीला काय करतां चांगली माशाएवढी माशी

पोटांत गेली तरी कांहीं नाहीं. बरं--पण--मगाशीं एकटे आपले एवढ्या विचारांत कसल्या बसलां होतां ? ”

“ अहो विचारांना काय विचारतां ? कोणी विचारील तेव्हांचा विचार ! ”

“ वाः म्हणजे आणखी तें कसं काय विचारायचं ? ”

विठ्ठलपंतांना हवा तोच प्रश्न निघालेला पाहून ते अधिकाधिक अधीर होऊं लागले. न सांपडणारी वस्तू सांपडेल, नापत्ता पत्र डेड लेटर म्हणून परत येईल, किंवा विषमज्वर मुदतीच्या आंत उतरेल. परंतु अशी संधी परत येणार नाहींसें वाटून त्यांचा धीर सुटला ! त्या भरांत विचारांची कोंडी फोडून ते विलक्षण आविर्भावानें उद्गारले:...

“ तें लपंछपं नको—बोला—मुलाखतच घेतां का माझी ? ”

“ म्हणजे—हें काय विचारावं—मोठ्या आनंदानें—आमच्या पत्राचं तेंच तर ध्येय—तेवढ्यासाठीं वाटेल त्याची जर मुलाखत आम्हीं घेतों—तर—विठ्ठलपंत, तुमचा हो काय प्रश्न ?—परवांच अशी कांहीं अडचण पडली म्हणतां—शेवट आपल्या ग्यानबा न्हाव्याला गांठून त्याची सचित्र मुलाखत दिली झालं ठोकून ! हं—चला शुभस्य शीघ्रं ”

विठ्ठलपंतांना छापखान्यांबद्दल अत्यंत आदर वाटूं लागला. परंतु स्वतःचा फोटो घेतलेला नसल्यामुळें, फोटो घेण्यानालायक चेहरा करून ते म्हणाले:—

" सचित्र मुलाखतीला फोटो पाहिजे, तो मात्र नाहीं माझ्याकडे. "

" कांहीं हरकत नाहीं. आमच्या पेपरच्या छपाईचें विशेष हेंच कीं कोणाचाहि फोटो छापला तरी तो ओळखू येण्याची भीति नाहीं:—हे घोडेच घ्याना—रावसाहेब झाले—त्याच दिवशीं आमचा ब्लॉकमेकर मेला—अशा आणिबाणीच्या प्रसंगीं काय करणार—कोणाला सांगितलं तर खोटं वाटेल—परंतु प्रत्यक्ष घोड्याचाच ब्लॉक तयार होता—तोच दिला दडपून—पण कोणाची मजाल नाहीं—ही घोडचुक उघडकीस आणील. तोच अनुभवसिद्ध ब्लॉक जरा साफसुफ करून छापूं म्हणजे झालं. वर नांव यायचं असतं—नांवाला कांहीं फोटोसारखं दिसलं म्हणजे भागतं. " असें म्हणून संपादक महाशयांनीं लेखनसाहित्य सिद्ध करून मुलाखत घेण्यास क्षणाचाहि विलंब लागूं दिला नाहीं. ही मुलाखत किती वेळ चालली हें कळण्याला मार्ग नव्हता. विठ्ठलपंतांच्या घड्याळाचे कायमचेच बारा वाजले आणि छापखान्यांच्या घड्याळाचे कांटे मालकाबरोबर फिरून-फिरून ढिले झालेले ! तथापि भोजनविधि विठ्ठलपंतांकडेच उरकावा लागला यावरून साधारण कल्पना होण्यासारखी आहे. दुसऱ्या दिवशींच्या ' मुलाखत ' पत्रांत प्रसिद्ध झालेली सदरहू मुलाखत या सोबत जशीच्यातशीच जोडणें श्रेयस्कर वाटतें.

# अद्वितीय मुलाखत !!

## वाचा ! वाचवा ! अथवा पढवा !!

### श्रीयुत विठ्ठलपंत ढमढेरे



( विठ्ठलपंतांच्या नकळत घेतलेल्या वरील स्नॅपशॉटमधें विठ्ठलपंत समाधिस्त स्थितींत बसलेले दिसून येतील. उजव्या बाजूचें दृश्य त्यांच्या कुटुंबाचें असून त्यांनीं विठ्ठलपंतापुढें हात जोडलेले असावेत)

आमच्या खास बातमीदारानें विठ्ठलपंतांची घेतलेली पुढील मुलाखत वाचून "बहुरत्नावसुंधरा" असेंच कोणालाहि वाटल्यावांचून रहाणार नाहीं ! इतकेंच नाहीं तर आज पुढारी

होण्याला कोणी लायक असेल तर ते विठ्ठलपंतच होत अशी सूज्ञ वाचक एकमुखानें ग्वाही देतील असा आम्हांला पूर्ण भरंवसा आहे. तरी हा मुलाखतीचा मेवा चाखा, खा, आणि त्याचें रवंथ करा?

प्रश्नः—चालू राजकारणासंबंधीं आपला विचार चालूच असेल?

उत्तरः—चालू! अहो तो न चालून कसं चालणार! राजकारण म्हटलं कीं विचार करण्याचं देखील कारण पडत नाहीं. ते चालूच असायचं-कधीं संपेल तेव्हां खरं! काय?

प्रश्नः—त्याबद्दल आपलं काय म्हणणं आहे मग?

उत्तरः—मग कशाला आताच सागतों घ्या-आणि त्यांत म्हणणं काय असायचं-खासगी सांगायचं म्हणजे साफ चुकत आहे झालं पुढारी म्हणविणाराचं-काय समजला?

प्रश्नः—तें कसं काय?

उत्तरः—कसं काय म्हणजे काय? हे तुमचे पुढारी इतके माघारी असून देखील त्याना आणखी माघारी जातां येऊं नये हें काय पुढाऱ्याचं लक्षण? आलं का ध्यानांत?

प्रश्नः—माझ्या नाहीं येत लक्षात काय तें.

उत्तरः—तें काय तें तुमच्याच लक्षांत आलं नाहीं असं नाहीं. अहो—लक्षात एकाच्याहि लक्षांत आलं नसेल काय?

प्र०:—आपणच सांगा तर मग.

उ०:—तेंच तर मी सांगतों आहे ना? भगवानांच्या वचनाची एकालाहि दाद लागली नाहीं. काय समजलं!

प्र०:—तें कोणतं वचन असं!

उः—असं तसं नाहीं-तें चांगलं स्वच्छ आहे. काय? आजकाल "स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे" असं

जो तो हक्कानं सांगत आहे. पण हक्काचा असा जमिनीचा चत्कोराएवढा तरी तुकडा कोणचा आहे असं सांगतां येईल का ? हा जन्मसिद्ध हक्क गेला कां हो तर मग ? मी तर असं सिद्ध करून देतों-काय समजला-कीं जन्मास येण्याचाहि कोणाला हक्क असा नाहीं. मरणाचाच काय तो प्राणिमात्राला हक्क आहे. काय ध्यानांत आलं का मी काय म्हणतों तें ?

प्र०:—साधारण कल्पना येत चालली पण—

उ:—पण ही नुसती कल्पना आहे तुमची. खात्री करून घ्यावी—काय समजला—भगवंतांनीं काय म्हटलं आहे ?

प्र०:—काय ?

उ०:—अस्स—असं विचारा—भगवान आकाशवाणीनें सागतात—काय लक्षांत आलं का—"यदा यदाहि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत । धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे" काय ?

प्र०:—असं वचन आहे खरं.

उ०:—खरंच आहे तें—तुम्ही काय समजलां—सत्यस्वरूपांत असत्याचा संभवच नाहीं—काय ?

प्र०:—हें खरं आहे पण—

उ०:—हाच तो पण—भगवंताचा हा पणच आहे—काय—?

प्र०:—तो कसा काय—

उ०:—हेंच तर त्यांतलं गूढ आहे. आलं का नाहीं ध्यानांत ?

प्र०:—गूढच म्हणून तें ध्यानांत कसं यायचं?

उ०:—यायचं कसं म्हणून कसं चालेल—काय—तें तर ध्यानांत यायलाच पाहिजे—हेंच वचन नकरार्थी करा म्हणजे समजेल काय तें—काय समजला—धर्माची ग्लानि झाल्याखेरीज अवतीर्ण होणार नाहीं असाच नाहीं का स्पष्ट अर्थ होत—काय?

प्र०:—होतो.

उ०:—झालं तर मग. अं?

प्र०:—नाहीं समजलों अजून.

उ०:—समजायला जूनच आहे जरा तें—काय समजलां—जर कांहीं—व्हायला हवं असेल तर ती धर्मग्लानि—काय?

प्र०:—ती तर होतच आहे.

उ०:—छेः छेः छेः चुकता तुम्ही—धर्म मूर्च्छित पडेल इतकी परिस्थिति निर्माण केली पाहिजे. काय?

प्र०:—म्हणजे करायचं तरी काय?

उ०:—कांहीं करायचं नाहीं हेंच करायचं—आलं लक्षांत—सर्व चळवळ बंद करायची सोडून नाहीं—नाहीं त्या चळवळी पाहून माझा जीव कळवळून जातो. काय?

प्र०:—चळवळीच बंद करून काय होणार?

उ०:—हः हः छापखाने—काय सांगावं तुम्हांला—अहो म्हणजेच ती खरी असहकारिता होणार—खाणंपिणं तर काय पण श्वासोच्छ्वास देखील चालतां कामा नये—काय? यमधर्माचें कार्य बंद पडेल इतकी असहकारिता केल्याखेरीज भगवान अवतीर्ण होत नाहींत हें पक्कें लक्षांत ठेवा.

प्र०:—बरं हल्लींच्या शिक्षणक्रमाबद्दल आपलं काय म्हणणं आहे ?

उ०—हा अनुक्रम ठीक काढलात– शिक्षणक्रम असाच चालून कांहीं फार दिवस चालण्यासारखं नाहीं. काय समजलां ? तो विशेष चालायला हवा असेल–काय–तर फिरत्या शाळा काढल्यावांचून चालूच शकणार नाहीं. अं:

प्र०:—अहो–पण दिवसेंदिवस पदवीधर सुशिक्षितांना-सुद्धां वणवण करीत फिरावं लागत आहे त्याची वाट काय ?

उ०:—म्हणूनच मी म्हणतो, वाटेवाटेवर शाळा असल्या म्हणजे निराळया धर्मशाळांची पण गरज उरणार नाहीं. काय ?

प्र०:—थट्टा राहूं द्या मी खरंच विचारतों.

उ०—खरं ना–आणि म्हणूनच मी म्हणतों ही शिक्षणाची थट्टा राहूं द्या आतां ? काय समजलां ?

प्र०:—म्हणजे ही सारी थट्टाच चालली आहे आपल्या मतें ?

उ०:—त्याला मतें नको घ्यायला वेगळीं–काय–तुम्हींच तर सांगतां पदवीधरांची दैन्यावस्था अं:-असें आहे तर मग जातात कशाला हो सारी कार्टी त्या शाळाकॉलेजांतून ?

प्र०:—न जाऊन काय करणार ?

उ०:—जाऊन काय करीत आहेत ?–काय–? तेंच न जाऊन निदान शिक्षणापायीं होणाऱ्या खर्चाची तरी बचत करायची दुसरं काय ? मी शाळेचं तोंड पाहिलें नाहीं म्हणून

काळ तोंड तर करावं लागलं नाहीं ना मला ?—अं—लग्न व्हावयाला देखील कांहीं अडचण पडली असं नाहीं. बहिरी मुलगी पतकरावी लागली, पण तिला तरी कोणी पत्करायला हवंच होतं कीं नाहीं ? काय ? तसं म्हटलं तर लिहावाचायला माझ्यापेक्षां जास्तच येत आहे—म्हणा. लक्षांत आलं कां ?

प्र०:—हो बरी आठवण केलीत. स्त्रिशिक्षणाबद्दल आपलं काय मत ?

उ०:—माझं मत विचाराल—काय—तर मी म्हणतों जर कोणाला शिक्षण द्यावयाचं असेल तर तें फक्त स्त्रियानाच. काय समजला ?

प्र०—म्हणजे काय पुरुषांना शिक्षण नसलं तरी चालेल म्हणतां ?

उ०:—चालेल कसलं—त्यांना नकोच आहे—माझं म्हणणं—काय ?

प्र०:—तें कां बरें ?

उ०:—अहो बरं नाहीं तें. पुरुषजातीला शक्ति दिलेली आहेना—काय—मग त्यापेक्षां कसलीच गरज नाहीं. इतकंच नाहीं तर तें उलट वाईट आहे. आलं का ध्यानांत ?

प्र०:—नाहीं.

उ०:—नाहीं कसं—या शक्तीचं लक्षणच असं आहे कीं—तिला नसत्या शहाणपणाची जोड मिळाली कीं ती काय करील आणि काय नाहीं तें सांगूं नका—या सुशिक्षित म्हणविणाऱ्या

पुरुषशक्तीनेंच नाहीं का अबलांना आणखी निर्बला करून सोडल्या ?–काय ?–त्यांना अबला म्हणायचं आणि त्यांच्या-कडून या धष्टपुष्ट पुरुषांनीं काबाडकष्ट करून घ्यावयाचे ! का–आहे का नाहीं न्याय ? हा कशाचा परिणाम हें लक्षांत घ्या–आलं का नाहीं लक्षांत–एक शक्ति आणि त्याच्या जोडीला नको तें शिक्षण–काय असंच का नाहीं ?

प्र०:—असं कसं म्हणतां येईल ? पुरुषांनीं कमवावं आणि स्त्रियांनीं त्याचा उपभोग घ्यावा असाच नाहीं का पुरुषांचा वास्तविक हेतू ?

उ०:—हेतू कि नाहीं–काय समजलां–दिसायला मोटा गोड आहे–काय ? परंतु त्यांतलं खरं रहस्य आहे वेगळंच. अंः

प्र०:—तें काय ?

उ०:—काय तें सांगतोंच. काय हो–हा बेटा पुरुष, कमावून कमावून कितीसा कमावणार हो असा ? जेमतेम चरितार्थ चालवण्याची मारामार कशी आहे हें साधारणतः पहातांच तुम्हीं–काय–अशा स्थितींत बायकोला गृहकृत्य करूं न देतां तेवढ्यासाठीं दोन नोकर ठेवीन म्हणेल तर बारा वाजतील बारा–अहा कुटं ?

प्र०:—रिकामा बसून स्त्रियाचा वेळ तरी कसा जावा ?

उ०:—अहो. जावा जावा बसतील गप्पा मारीत–त्याची नको काळजी–काय समजलां–रिकामा बसायला वेळच आहे कुठं त्यांना–आणि–काय–हो–वेळ जाण्यासाठीं खेळाला

न जातां पुरुष का—बरं तेवढंच दळण कांडण करून वेळ घालवीत नाहींत ?

प्र०:—आधीं—हें पहा—शिक्षणाला अवश्य तेवढी बुद्धि स्त्रियांच्या ठिकाणीं कुठं आहे ?

उ०:—ह्यः ह्यः ह्यः छापखाने—हः हः हः, अहो-हः हः असं म्हणतो कोण ?

प्र०:—कोण म्हणजे ?

उ०:—म्हणजे बिणजे कांहीं नाहीं—ह्यः ह्यः ह्यः हे बेटे पुरुषच असं म्हणतात ना ?

प्र०:—मग काय स्त्रिया पुरुषांइतक्या बुद्धिवान आहेत असं आपलं म्हणणं ?

उ०:—होय—हो— हः हः म्हणणं कसलं—पुरुषांइतक्याच का अधिक म्हणा ?

प्र०:—तें कसं काय बोआ !

उ०:—या बोआचीच अक्कल बाईपुढं कशी हो चालत नाहीं तेवढी ? काय ?—पुरुषासारखा शक्तिमान प्राणी ताब्यांत ठेवणं सामान्य अकलेचें काम समजतां कां—काय—साक्षात पुराण पुरुषाला—घोरत ठेवून आदिमायेनें निर्माण केलेला हा अघटित पसारा अकलेवाचून का झाला ?—पार्वतीदेवी नसती तर हे छंदिष्ट दिगंबर आणखी काय काय थेर थेर करते हें सांगूं शकेल का कुणी ? काय—ज्या रामाच्या नुसत्या नाममंत्रेंकरून पाण्यावर दगड तरले—काय—त्या रामाची, सितािवरहानें शोकाश्रुसागरांत

बुडण्यापर्यंत पाळी यावी ? बोला की--पांडवांसारखे बलाढ्यवान पतिपंचायतन जिनें सौभाग्य मानून संभाळलें ती महान साध्वी द्रौपदी काय तुमच्या मतें खुळी असावी ? --काय-उलट द्यूत खेळून पाडवासारख्या पुरुषांनीं आपल्या अकलेचा काय प्रकाश पाडला ? हतवीर्य झालेल्या अर्जुनाला घोड्यावर बसवितां बसवितां त्यानें साक्षात भगवानालाहि त्राहि भगवान करून सोडलें. काय-धर्मासारखा धर्मभ्याड, अर्जुनासारखा आरंभशूर, भीमा-प्रमाणें आडदांड, आणि त्यांच्या जोडीला ती जयविजयाची जोडी एकट्या द्रौपदीनें विचित्र नातें संभाळून ताब्यांत ठेवली याहून स्त्रियांच्या बुद्धिमत्तेचा अधिक तो पुरावा काय पाहिजे ? अं: नाहीं तर तो द्रौपदीचा भाऊ कृष्णच घ्याना--त्याला पट्टराण्या अशा काय त्या दोनच ना-पण त्यांचीं भांडणें मिटवतां मिटवतां अखेर कंटाळून जाऊन-काय-त्या कलागातिप्रिय कृष्णालाहि सोळा सहस्त्र इतर स्त्रिया पुरवल्या-सांगा आतां या बहिणी भावंडांतच अधिक बुद्धिवान कोणाला म्हणतां ? अं: ?

प्र०:—असं आहे तर पुरुषांनीं शिक्षण घेण्याची पद्धत कां पडली ?

उ०:—कां म्हणजे तशी जरूरच पडली-काय-बुद्धीनें आपण कमी आहों हें जाणूनच ती उणीव शिक्षणानें भरून काढणं पुरुषांना भागच झालं. लक्षांत आलं का—जात्याच बुद्धिवान स्त्रियांना शिक्षणानें आणखी सुसंस्कृत करावं तर पुन्हां त्यांचीच सरशी होणार—काय समजलां—तेव्हां तसं करण्याचं

धाडस पुरुषासारखा पुरुष झाला म्हणून त्याला थोडेंच होणार–काय ? स्त्रिया आतां शिक्षण घेऊं लागल्यामुळें, लवकरच काय तो चमत्कार दिसून येईल.

प्र०:—तो काय ?

उ०:—'तो'ला 'ती' व्हावें लागेल ' ती' काय समजलां ?

प्र०:—कशावरून आपण इतकं म्हणतां तें नकळे.

उ०:—नकळे म्हणून थोडेंच चालणार आहे–काय ? पुढील भविष्य लक्षांत घेऊन नवीन नवीन चालू असलेल्या तरतुजी ध्यानांत घ्या म्हणजे झालं. काय समजलां ?

प्र०:—कोणत्या त्या ?

उ०:—कोणत्या कोणत्या म्हणून सागूं–संततिनियमन घटस्फोट-काय एकना दोन-कशासाठीं-हो-साऱ्या ?

प्र०:—नाहीं समजलों.

उ०:—आतां काय करणार ? स्त्रियाचें गृहकृत्य, बाल-संगोपन वगैरे कामें–काय–पुढेंमागें पुरुषांना करावीं लागणार यात कोणालाच शंका वाटत नाहीं. आलं का लक्षांत. त्यांतल्या त्यांत तीं परवडतील अशीं असावीं–काय--अशा घाटानें हें सर्व चालूं आहे. इतकं कशाला-काय ? स्वराज्याच्या चळवळींत खरंच म्हणाल तर विशेषतः हेंच रहस्य आहे, काय समजला ?

प्र०:—छत्–काय हें भलतंच ?

उ०:—भलतं म्हणतां भलभलतें होईल तेव्हां समजेल. काय–भावी स्त्रीराज्यांत–" स्वधर्मे निधनं श्रेयं " या न्यायानें

निदान स्वराज्य तरी असावं एवढ्यासाठीं या साऱ्या खटपटी आहेत दुसरं काय-काय स्त्रीराज्य झालं तरी शक्तीची कामं स्वाभाविकच पुरुषांकडे येऊन केरपोतेरं करावं लागण्यापेक्षां निदान लष्करांत तरी दाखल होतां येऊन ही मानहानी-फारशी जाणवणार नाहीं. आलं का नाहीं ध्यानांत ?

प्र०:—उद्योग धंद्यासंबंधीं आपणाला काय वाटतं ?

उ०:—वाटायचं तेंच वाटतं-काय-"उद्योगं पुरुष-लक्षणं" काय समजलां ? उद्योग हें जर पुरुषाचं लक्षणच मानलं आहे तर आणखी नसते धंदे काढून "व्याप तितका ताप" करून घेण्यांत शहाणपणा नाहीं असं माझं टाम मत आहे. काय ?

प्र०:—पण उद्योगधंद्यावांचून चालावं कसं ?

उ०—कसं तें पहा आपलं-काय-पण उद्योगधंदे तरी चालले आहेत का धड-काय-रिकामपण तरी आहे कोणाला हे उद्योग धंदे करायला-अं:-विद्यार्थीवर्ग शाळाकॉलेजात गुंतलेला, प्रौढ म्हणविणारे नोकरींत डांबलेले, राहतां राहिल्या स्त्रिया, काय -त्यांच्यामागें सतराशे साठ कामं-शिवाय नोकरीचं वैभव का धंद्याला आहे-सर्वांना नोकऱ्या मिळत्या तर उद्योग-धंद्याचं नांव देखील नसतं काढलं एकानं-काय समजलां-परदेशांतील उद्योगधंद्याला आपल्यासारखं खंदे गिऱ्हाईक आहे तें नाहीसं करून चालू धंदे बुडवण्यांत तरी काय मतलब ?

प्र०:—वृत्तपत्रांसंबंधीं आपलं काय म्हणणं ?

उ०:—हें काय म्हणणं ?—त्यावर तर आपलं अस्तित्व अवलंबून आहे असं म्हणा—काय ?—स्वराज्य मिळो वा न मिळो-

काय समजलां ?—पण वर्तमानपत्र वाचायला मिळाल्याखेरीज आजकाल वाचणंच शक्य नाहीं. काय ?

प्र०:—असं झालं आहे खरं.

उ०:—खरं म्हटलं तर—आलं का ध्यानांत—जग बुडण्याचा प्रसंग पुढें मागें येणार असं गृहित धरून—काय—त्या प्रलयकालची हकिगत समजण्यासाठीं वृत्तपत्रें तेवढी तरंगत सुरक्षित रहातील—काय समजलां ? अशी व्यवस्था आजपासून करून ठेवणं अवश्य आहे-काय ?—

प्र०:—माझं म्हणणं वृत्तपत्रांचं धोरण कसं असावं ?

उ०:—असावं कसलं ? ह्यः, ह्यः, ह्यः धोरण नाहीं म्हणतों तें हेंच—काय—अहो ज्याला कांहीं धोरण असावं लागत नाहीं काय समजलां—अशी जर कोणती गोष्ट असेल काय—तर ती वृत्तपत्र आणि हें एक त्यांचें वैशिष्ट्य. आलं का लक्षांत ? वारा येईल तशी पाठ द्यायची याला धोरण म्हणावयाचें असेल—काय ?—तर ते कसं असावं अन् काय असावं हें कोण हो सांगू शकणार ? काय ?

प्र०:—माझ्या विचारण्यांतील हेतू वर्तमानपत्रांच्या प्रतिष्ठितपणाबद्दल आहे.

उ०:—अस्सं ! अस्सं ! आतां आलं ध्यानांत... काय—समजलां—पण—काय—हो—प्रतिष्ठितपणा म्हणजे तरी तुह्मी काय समजतां ?—नुसता लुच्चेगिरीचा मामला आहे—काय—?

प्र०:—तो कसा काय ?

उ०:—कसा न काय हें ते शिष्टच जाणोत—काय समजला थोडक्यांत सांगायचं तर मी असं ह्मणेन—काय—कीं ज्याला शिष्ट म्हणून समजतात तसा खलपुरुष नाट्यसृष्टींतही कोणाला निर्माण करता आलेला नाहीं. आलं का ध्यानांत ?

प्र०:—असं कसं म्हणावं ?

उ०:—म्हणूं नका वाटलं तर—काय—आणि हाच तो शिष्टपणा—काय समजला ?—मनांत एक बोलायचं दुसरं—काय—दाखवायचे दांत निराळे आणि खायचे वेगळे—समजला का—सागायचं एक, करायचं तिसरंच—काय—दिसायला साधू असायचे भोंदू—लक्षात आलं का—तोंडावर गोड मागें बिनतोड—अंः—वरून शुचिर्भुत अंतर्यामीं भूत—काय—वाचेचे कर्ण, आणि कर्णाचे द्रोण, अंः असल्या या शिष्टांचं सत्यस्वरूप ओळखणार कोण ?—काय ? ”

प्र०:—सगळेच कोठें असे असतात ?

उ०:—असतात अन् नसतात. तें ओळखूं येतील तेव्हा कळायचंना—काय समजला—शिष्टतेचं कातडं पांघरल्या नंतर एखादा भामटा देखील ओळखूं येणार नाहीं—आलं का ध्यानांत—मीं म्हणतों उघडा शत्रु बरा पण हे शिष्ट नकोत—काय—

प्र०:—हें जरा विषयांतर होत नाहीं का ?

उ०:—कां नाहीं होणार ?—साव आणि चोर यांतील अंतर दाखविण्यासाठीं हें सांगणं भागच नाहीं काय ? का ?

प्र०:—तें असो–पण वर्तमानपत्र शिवराळ होत आहे अशी कित्येकांची ओरड दिसते–त्याबद्दल विचारतों ?

उ०:—तोच विचार मी करीत होतों–हें–पहा–काय–शिवराळपत्रांना कोणी कितीहि शिव्या देवोत–आलं का लक्षांत–पण आज काल कोणाला कांहीं वाचावंसं वाटत असेल तर तेंच नाहीं का ?–काय–तसं नसतं तर शिवराळ पत्र नांवालाहि राहतं ना–लक्षांत आलं ?–शिवराळ पत्र झालं म्हणून तें ग्राहकांवांचून तर चालूं शकत नाहीं ?–काय–. आणि शिवराळ झाल्याशिवाय ग्राहक मिळत नसतील–तर त्यांनीं तरी शिवराळ न व्हावं तर काय करावं हो ? अं: असल्या पत्रांकडे शिवराळ म्हणून नाकें मुरडणारे, चांगले चांगले शिष्ट–काय–उलट त्याच नाकावर चष्मा ठेवून चोरट्या मुरडीनं हा शिवराळपणा वाचल्याशिवाय सोडीत नाहींत. काय समजला–शिष्टपणा राखण्यासाठीं स्वतः शिवराळ होता येत नाहीं तेव्हां परभारें–पावणे तेरा या न्यायानें–काय ती हौस शिवराळ पत्र वाचून भागविणारे किती शिष्ट दाखवून देऊं तुम्हाला ? काय ?

प्र०:—मी काय म्हणतों त्याला थोडी फार शिस्त असावी !

उ०:—अरेच्या ! म्हणजे–हा चमत्कार नव्हे तर काय–अहो–बोलून चालून शिव्या द्यायच्या आणि त्याला म्हणे शिस्त असावी ?–काय–हें म्हणणेंच आधीं किती गैरशिस्त आहे. काय–आलं का ध्यानांत ?

प्र०:—तसं नाहीं–पण–एखाद्या भूषणभूत लेखकाला चोर, दरवडेखोर, परपुष्ट नाहीं नाहीं तें म्हणण्यापर्यंत मजल गेली आहे अलिकडे !

उ:०—याच्याहि पलिकडे जाणार मी म्हणतों–काय–सामान्य शिवीगाळीनें वाचकांचं मनरंजन होत नाहींसं झालं—काय--म्हणजे वरच्या दर्जाचे अपशब्द सौष्टव प्रचारांत येणारच–काय समजला–आणि—छापखाने--ह्यः ह्यः मला मोठं एक तुमचं नवल वाटतं--काय--? हः हः हः.

प्र०—तें काय बोआ आणखी ?

उ०:—आणखी काय पाहिजे ? हः हः हः, गंमत आहे झालं-काय-अहो भले गृहस्थ-ज्याला तुम्ही गैरशिस्त म्हणतां-काय-त्याचा कोणी चुकून देखील प्रतिकार कांहो करीत नाहीं. अं:. याच्या उलट राजद्रोहाचा खटला चालला नसेल-काय धरणी-कंपाच्या बातमीनें वृत्तपत्राचें स्तंभ हदरले नसतील–काय–किंवा भयंकर रोगाची साथ इतक्या उसळीनें उद्भवली नसेल—काय—असं या वादाला स्वरूप येण्यासारखं त्यांत काय होतं ? आलं का ध्यानांत मी काय म्हणतों तें ? चोर म्हणणारा हरामखोर ठरला. काय ! त्याच्या शिवराळ लेखाला तपोवृद्धपत्रानें उदार आश्रय दिला–काय–उरलेसुरले अभिनंदन इतरांनीं केलें. काय हेंच काहो तें वाङ्मयपावित्र्य कां आतां कां नाहीं बोलत ? अं:

प्र०:—हें पहा हा व्यक्तिविषयक प्रश्न......आपण सोडून देऊं.

उः—...मग प्रश्नच सुटला की सगळा—काय समजलां मी तरी दुसरं काय म्हणतो-शिवराळपत्रांना शिव्या देणें हा नुसता काय शिष्टाचार आहे. शिष्टाचार पहूं द्या कीं प्रतिष्ठित म्हणविणारीं पत्रेंच शिवराळ होतात कां नाहीं तें पहा—काय समजलां ? कलिमहिमाच असा आहे-काय ज्याला कागदी घोडे म्हणून समजतात—काय ? जगभर ज्यांचा थयथयाट चालला आहे—काय ? ती वृत्तपत्रें म्हणजे दुसरें-तिसरें कांहीं नसून तीं मूर्तिमंत कलंकी अवताराची छायाचित्रें होत. लक्षांत आलं ? या अवताराची छाया आजकाल घोड्यावर कशी पडली आहे तें लक्षात घ्या-लक्षात आलं का ? वर्तमानकाळीं घोड्याला आलेली तेजी कशाचे लक्षण आहे ! काय—शर्यतीच्या घोड्याच्या किंमतीला पांच पन्नास पदवीधर कोणी विकत घेणार नाहीं, याचें कारण काय ! काय ? श्रीमंताचे वैभव आज शर्यतीचा घोडा उपभोगीत आहे हें कशाचें द्योतक होय ? काय ? कोट्यवधी लोक या घोड्याच्या मागें गाढवासारखे धांवत सुटावे-काय-आणि कोट्यवधी रुपयांची क्षणार्धांत उलथापालथ व्हावी हा महिमा कोणाचा ? काय रावाचा रंक व रंकाचा राव करण्यास घोडा समर्थ व्हावा यावरून काय निष्पन्न होतें—काय—वृत्तपत्राचे कागदी घोडे निराळे काय सांगतात ! मुद्रणपिशाच्याच्या साह्यानें हे कागदी घोडे काय करूं शकणार नाहींत ! लक्षांत

आलं ? एवढ्याचसाठीं ईश्वरी अवतार समजून मला त्याबद्दल मोठा आदर वाटतो काय समजला !

प्रः—नाटकांत स्त्रियांच्या भूमिका स्त्रियांनींच कराव्यात असं पुष्कळांचं म्हणणं दिसतं त्याबद्दल आपलं काय मत आहे ?

उ०:—गंमत आहे झालं ! काय ? खरं नाहीं ते नाटक हें तर खरं ? अं ?

प्र०:—उघडच आहे. पण म्हणून...

उ०:—पण नाहीं, अन् म्हणून नाहीं, काय समजला ?—नाटकांतील देखावे खोटे, कपडेलत्ते खोटे, दागिने खोटे, राजा खोटा, मग असं म्हणतों कीं नाटकांतील पुरुषही खोटा असावा, म्हणून स्त्रियांनीं पुरुषांच्या भूमिका करणें अवश्य आहे-काय ?

प्र०:—तुमचा हा तृतीय पंथच म्हणावयाचा ?

उ०—म्हणावयाचा कशाला आहेच. दिसावयाला स्त्री आणि असावयाचा पुरुष हा तृतियपंथ नव्हे तर काय ? अं ?

प्रः—एवढ्यासाठींच स्त्रियांच्या भूमिका स्त्रियांनीं केल्या म्हणजे अधिक चित्ताकर्षक होईल असं नाहीं का ?

उ०:—नाहीं कां कसलं ? असंच होईल—काय ?—आणि म्हणूनच तें नको—काय समजला ?-स्त्रीभूमिका करणाऱ्या पुरुष नटावर देखील बेहद्द खूष होऊन त्याच्या नादी लागणारे पुरुष आपण पहातों—काय, लक्षांत आलं का ? तर साक्षात स्त्रियाच जर हीं कामं करूं लागल्या तर पुरुषवर्गाची काय अवस्था होईल?-काय?-

प्र०:—सिनेमासृष्टींत तर ही सुधारणा झालेलीच नाहीं का ?

उ०:—कां म्हणून काय विचारता आणखी ?-काय-त्यामुळें नाटक कंपन्यांची स्थिति कशी झाली आहे हें पहातांच ना तुह्मी ?-काय-नुसत्या छायाचित्रांचा जर इतका परिणाम-काय-तर मी म्हणतों त्याला आणखी पुरावा तो काय पाहिजे ? काय ?

प्र०:—तें कांहीं असो पण सिनेमांतील या सुधारणेमुळें आतां नाटकांत पुरुषनटानें केलेली स्त्रीभूमिका वाईट दिसूं लागली आहे.

उ०:—माझ्या आई तेंच बरं बरं ! काय—ती जितकी वाईट दिसेल तितकी समाजाची नीति शाबूद राहील असं समजा—काय समजलं ?

प्र०:—जातिभेदाबद्दल आपणाला काय वाटतं ?

उ०:—पुष्कळ वाटतं--काय? पण तें वाटून खायचं का आहे? अं ! ईश्वरसत्तेपुढें कोणाचं काय शहाणपण चालणार ? हा स्त्री-पुरुष भेदच घ्या ना--काय !—तो तुम्हीं आम्ही का निर्माण केला आहे ? त्यामुळें होणारे अनर्थ दिसत असून कांहीं उपयोग आहे का ?- अं ?--हा भेदभाव नसता—काय—तर काय बिघडणार होतं हो त्या ब्रह्मदेवाच्या बापाचं ? अं ?—हा लेकाचा नाहीं कां नाभीकमळांतूनच उत्पन्न झाला ?—काय?-तसाच तो ब्रह्मचारी हनुमान--बिचारा कुठं घाम पुसायला गेला तो मगरीनें डाव साधून त्यालाहि पुत्ररत्न झालं ? कां आहे कां नाहीं चमत्कार ? प्राणिमात्रांच्या

ठिकाणींच तेवढा हा भेद कशाला हो—पाहिजे होता ? झाडाला फळें फुलें येतात तशींच प्राण्यांना येती तर काय हरकत होती ?—काय ?—परंतु हा देव-म्हणजे असा तसा कां आहे ?·अं ?—स्वतःच्या जिवाची करमणूक करून घेण्यासाठीं त्यानें वाटेल तें करण्यास कमी केलेलं नाहीं—आलं का ध्यानांत ?—मी तर म्हणतों हा निव्वळ त्याचा चावटपणा आहे-काय ?—नानातऱ्हेनें प्राणिमात्रांचा छळ करून अखेर त्याला मारायचं-त्यांत मात्र भेदभाव नाहीं—काय—ईश्वरीन्याय ईश्वरी न्याय म्हणून जर कांहीं असेल तर तो हा एकच ! काय समजला-आणि जितके भेद निर्माण करता येतील तितके करावयाचे हा तर त्याचा संकल्प-काय-तर तुम्ही आम्ही काय करूं शकणार हो ?—जातिभेद मोडाला कोणी समर्थ असेल तर तो हा ईश्वरनिर्मित स्त्रीपुरुष भेदच होय-काय-समजला ?—ते चमत्कार आतां होऊं लागलेले असल्यामुळें-स्त्रीपुरुष एवढाच काय तो भेद शिल्लक रहावयाचा आहे-काय ?—

प्र०:—प्रौढविवाहपद्धतीबद्दल आपला काय अभिप्राय आहे ?

उ०:—हें जे आहे तें निराळं आहे-काय समजला ? ज्याला तुम्ही प्रौढविवाह समजतां तो वस्तुतः आधी प्रौढविवाह नव्हे, काय—?

प्र०:—मग त्याला काय म्हणावयाचं ?

उ०:—त्याला म्हणायचंच तर स्वैरविवाह म्हणतां येईल-लक्षांत आलं—तारुण्याच्या भरांत प्रेमाला प्रौढत्व कोठून असणार ?

साठीच्या घरांत गेल्यावर घरांत आपलं असं कोणी असावं एवढ्यासाठीं जो विवाह होतो त्यांत प्रौढपणा खेरीज कांहींच असूं शकत नसल्यामुळें तोच वास्तविक प्रौढविवाह नव्हे ?–काय?

प्र०:—हें खरं धरलं तरी बालविवाहपद्धति अनिष्टच नाहीं कां ?

उ०:—नाहीं का आहे, हें ठरवावयाचं कोणी ? अं ? लोक म्हणतात म्हणून ? काय–लोक काय वाटेल तें बोलूं शकतात—काय समजला ?—माणसाला वेड लागतं तें ह्या लोकांच्या मुळेंच–लक्षात आलं ?—एकाला अनिष्ट तीच गोष्ट दुसऱ्याला इष्ट होण्याचाही संभव असतो–काय ?—निदान ही बाब तरी तशी आहे. काय समजला ?

प्र०:—तीं का ?

उ०:—कां ती सांगतों –काय ? हा विषयच प्रत्येकाच्या स्वभावप्रकृतिमानावर अवलंबून आहे–लक्षात आलं ? –यांत वयमानाचें–बंधन लादणें अनिष्ट होय–काय ? ब्रह्मचर्य पाळावें असें सांगणारे काय थोडे आहेत ? –अं ? –डझनवारी मुलांचे आईबापसुद्धां असंच सांगतील–काय ? संततिनियमनाचा पुरस्कार करणारांच्या कुंडलींत पंचमस्थान ( विद्येच्या दृष्टीनें नसले तरी संततियोगांत ) बलवत्तर असतें. काय समजला ? –साठाव्या वर्षाची ज्युबिली चवथ्या लग्नानें साजरी करणारे विवाहप्रिय रसिक नाहींत असें नाहीं. काय ? –अहो–निसर्ग-धर्मापुढें कोणाचे काय चालणार–अं ? –तेव्हां वैवाहिक वयाच्या

बाबतींत फार तर “ मौंजीबंधन ” एवढेंच काय तें बंधन असावं असं माझं ठाम मत आहे. काय समजला ? –

प्र०:—घटस्फोटाच्या प्रश्नाविषयीं आपणांला काय वाटतं ?

उ०—वाटतं तितकं याचं उत्तर देणं सोपं नाहीं. काय ? हा मोठा गुंतागुंतीचा प्रश्न आहे—लक्षांत आलं ! ऐन तारुण्यांत मला कोणी विचारतं–काय- ? - तर विचार देखील न करता घटस्फोट व्हावेत असं मी सांगितलं असतं काय समजला ? आज मात्र तसं सांगण्याचं धाडस करतां येत नाहीं-काय ? परिस्फोट झाल्याशिवाय घटस्फोट झाले तर काहीं वावगं नाहीं. इतकंच मी सांगू शकेन-लक्षांत आलं !- बालविवाह, प्रौढ-विवाह, पुनर्विवाह आणि घटस्फोट, हे प्रश्न सुटण्याला एकच मार्ग आहे—काय !

प्र०:—तो कोणता !

उ०:—कोणता म्हणजे तोच कायतो आहे—काय ! प्रथम बालवयांत विवाह उरकून घ्यावा, तारुण्यांत घटस्फोट करून स्वैरविवाहास मोकळीक असावी, उत्तर वयांतील विधुरा-वस्थेंत पुनर्विवाहाश्रित प्रौढविवाह प्रचारांत यावा-काय-असं झाल्याखेरीज हे प्रश्न सुटण्यासारखे नाहींत. लक्षांत आलं-काय ?

प्र०:—बहुतेक प्रश्न विचारून झालेच म्हणावयाचे !

उ०—तसं म्हणावयाचं झालं तर अद्याप पुष्कळ बाकी आहे-काय ?- माझी एकट्याची मुलाखत वर्षभर पुरेल-

लक्षांत आलं ! झालं हें कांहींच नाहीं असं समजा काय समजला ? बरं तें असो–काय ! –फोटो मात्र भर ज्वानींतील दिसेल असा पैदास करा-काय ! त्या वेळचा माझा रुबाबदारपणा विचारूंच नका–लक्षांत आलं कां !–हे एक एक दंड मांडीसारखे होते–काय !–यावरून मांड्यांची कल्पना करा–ध्यानांत आलं–ऋद्धीसिद्धीसारख्या चार जोड्या खुशाल लोडासारख्या पोटाला टेकून बसाव्यात–काय–असलं शरीर होतं–पोट म्हणजे काय–लक्षांत आलं–एक–धोतरजोडी सबंद नेसावी तरी निऱ्यांना कमती पडायची–काय ! छातीकडे पाहून एखाद्याची छाती फाटून जायची, काय समजला !–चोळीच्या आकाराची घट्ट बंडी घातली नाहीं तर कोणाची छाती नाहीं पुढें येण्याची–काय ! एखादी गोष्ट धडाडीनें छातीला हात लाऊन सांगायाची झाली तर माझी मलाच भीति वाटायची छातीला हात लावायची–लक्षांत आलं ? नाभिकमळांत एक वेळ भुंगा शिरला–काय–पण मला कांहीं दाद नाहीं–त्याची–काय समजला ? चालूं लागलों कीं जमिनीला वीत वीत खाडे पडायचे, काय, तेव्हां थट्टेनें कोणी म्हणत विठ्ठलपंत मेला तर यमधर्माचा रेडा कांहीं जिवंत राहयचा नाहीं लक्षांत आलं ? आरशांत सबंध चेहरा कांहीं दिसायचा नाहीं कधीं. काय दोन आरसे एकाला एक जोडावे तेव्हां कुठं त्यांत मावला तर असला चवडा होता–लक्षांत आलें?–त्यावेळच्या आंगरख्यांची मच्छरदाणी केली आहे अलिकडे–काय-समजला ? शेंडीं म्हणजे काय होती !–

लक्षांत आलं ?–“ कीं तोडिला तरु फुटे आणखी भरानें, ” अशांतील गत–काय ? शेंडीचींच गंगावनं अजून पुरत आहेत घरांत. लक्षांत आलं ? माझा त्यावेळचा जोडा–काय ? आज तुमच्या डोक्याला येईल. लक्षांत आलं ? झोपेंत घोराला लागलों कीं इतरांना मंत्र जागरण वाटायचं–काय–? यामुळेंच तर लग्नाला भलताच विलंब झाला. काय समजला–नाहीं तर मुली कांहीं थोड्या नाहीं सांगून आल्याः–काय–परंतु नेमस्त वधू मिळणें दुरापास्त झालें. लक्षांत आलं ?–नवराबायकोचा जोडा विजोड दिसूं नये एवढ्यासाठींच तर हिच्या बहिरे-पणाकडे कानाडोळा करावा लागला–काय समजला ? तेव्हां या घाटाचा फोटो कसा काय मिळविणार ? काय ? —

प्र०ः—त्याची नको काळजी. प्रत्यक्ष माणसाचाच फोटो नाहीं मिळाला म्हणून काय झालं ! दोन तीन जनावरांचे फोटो असे बेमालूम जुळवून देतों कीं पहातच रहावं त्याच्या-कडे ! आणि त्याच्या जोडीला तुमचे हें शद्बचित्र असल्यावर काय पाहिजे आणखी ! बरं-येतों—नमस्कार.



# लग्नाची-कहाणी

खरं म्हटलं तर माझं लग्न हां हां म्हणतां केव्हांच व्हायचं; पण असं म्हणतां म्हणतां कधींच व्हायचं नाहींसं झालं एवढं मात्र खरं!

वाढतं वय नाहीं नाहीं म्हणतां बिजवरालाहि मागें टाकून पुढं गेलं; पुढें असं झालं कीं, प्रथमोपवर वधू नेमस्त मिळणं दुरापास्त, आणि चाळिशीच्या प्रौढ प्रशस्त घराण्यांतील नेमस्त पुनर्वधूच्या परिक्षेंत माझ्यासारख्या प्रथम वराचीच परिक्षा होऊन माघार घ्यावी लागली!

गरजवंताला अक्कलेची गरज नसते हें समजण्याइतकी ती पुनर्वधू गरजू नसावी; नाहीं तर विवाहोत्तर लवकरच मला विधुरावस्थेंत टाकण्याची तिची तयारी फुकट न जाता तिलाहि सौभाग्यांत मरण्याचे भाग्य सहज लाभलें असतें!

ज्योतिषशास्त्राच्या मतें एक तर मी जन्मास येण्याचाच संभव नव्हता. असं असून जन्मलोंच तर मरेपर्यंत किती बायका सौभाग्यांत निजधामास जातील याचा नियम नव्हता! असें ठासून वर्तवणारे सारे ज्योतिषज्ञहि मरावयाचे बाकी राहिले नाहींत; तरी देखील माझ्या दुराग्रही ग्रहांनीं एकाहि वधूला सौभाग्य-सौख्य अथवा वैधव्य दुःख देण्याचें मनीं आणलें नाहीं!

जन्म वेळ चुकीची म्हणावी तर इतकी संस्मरणीय व बिनचुक वेळ विरळाच! भूकंप आणि माझा जन्म एकाच

क्षणीं झाल्यामुळें, वेधशाळेंत नोंदला गेलेला माझा जन्म काल चुकीचा ठरविण्याची कोणाची प्राज्ञा नाहीं ! आणि संस्मरणीय म्हणण्याचें कारण, ज्योतिषांच्या म्हणण्याप्रमाणेंच डॉक्टरांनाहि वाटत होतें. जिवंत मूल जन्मास येईल अशी त्यांना आशा नव्हती; परंतु भूकंपाच्या धक्यासरशी माझी बंद पडलेली हृदयाची क्रिया जी चालू झाली ती आज तागायत बंद पडूं शकली नाहीं ! परंतु दुर्दैवाची गोष्ट अशी कीं याच भूकंपाच्या धक्यानें डॉक्टरांचे हार्ट फेल होऊन मला जिवंत पहाण्यास तें जिवंत राहूं शकले नाहींत ! आणि सर्वांत आश्चर्याची गोष्ट म्हणजे बाबांच्या जन्मापासून बंद पडलेले घड्याळ ह्या धक्यानें चालूं झाल्याचं आजी मोठ्या कौतुकानं सांगत असे !

सारांश माझी जन्मवेळ कांहीं अशि तशी नव्हती; त्यावेळच्या जन्मलग्नावर जन्मांतहि प्रत्यक्ष लग्नाची वेळ येण्याचा योग नसावा. किंवा न जाणों कदाचित या धरणीकंपाच्या धक्यानें सारे ग्रह मृत्युस्थानात कोसळले असतील तर ते गणिताच्या बापालाहि समजणार नाहीं ! लग्नाच्या बाबतींत देखील अशाच प्रकारचे धरणीकंप होत गेले !

आजी जिवंत रहाती तर ती पणतू पाहिल्याशिवाय मरती ना. सोडमुंजीला वर्ष होण्याच्या आंतच बाबांचं लग्न आजीच्याच आग्रहामुळं झालं. आईला तर आठवत देखील नसे. घास देतांना आई रडाला लागून पाय आपटत निघून गेल्याची आठवण देऊन बाबा आईला नेहमी खिजवित असत.

माझ्या लग्नाबाबदहि आजीचाच काय तो हट्ट. बाबा तिची समजूत घालण्याचा प्रयत्न करीत—पण आजी म्हणजे अशी तशी का होती ? एकदां ती रागावली कीं बाबांची सोय नसे तिच्या पुढें यायची. एक दिवस तर ती इतकी भडकली कीं बाबांच्याच श्रीमुखांत बसायची. इतक्यांत आई आल्यामुळें बाबांचा बचाव झाला ! आजी बाबाना कधीं कधीं गाढव कुठला असंहि म्हणे. त्यामुळेंच बाबा मला गाढवाचा लेक म्हणत असावेत.

एकदा मी आजीला म्हटलें " मला नको जा ती बायकोन् बियको. " तर ती खकसन् माझ्यावर ओरडून वेडावित म्हणाली " म्यॅग नवऱ्याच्या घाल्या त्युला " त्या वेळची ती तिची मुद्रा अन् अवसान पाहून सतरा-बायका पुरवल्या पण आजीचा तो चेहरा पहाणं नकोसं झालं मला !

शेजारची माणीक नातसून व्हावी अशी आजीची फार इच्छा होती. माणिकच होतं ते एक—शेंबडाशिवाय तिचं नाक मी कांही कधीं पाहिलं नाहीं ! असलं माणीक माझ्या गळयांत पडण्यापेक्षा आजी मरेल तर बरं असं मला झालं. आणि अखेर तसंच झालं ! कशी म्हणतां आजी मेली ? कोणाला पत्ता देखील लागला नाहीं.

बाबा गेले होते सत्यनारायणाच्या कथेला. आईला शिवायचं नव्हतं. चूल आली होती आजीकडे. तिचं सोवळं ओवळं कडक म्हणून आई दूर गाईच्या गोठ्यात बसलेली.

मला लागलेली भूक, म्हणून मी स्वयंपाक घरांत गेलो पण, आजी कुठं दिसेच ना. मी पुष्कळ हाका मारल्या पण ओ कोण देतो? माझ्या हाका ऐकून आई आंत आली. तिला हि कुठं आजी दिसेना म्हणून ती कंदील घेऊन पाहूं लागली. तों दुधाच्या फरताळाआड आजी झोंपलेली "सासूबाई सासूबाई" असं आईनं हाक मारून पाहिलं; पण "रामा-शिवा, गोविंदा;" आई घाबरून गेली. इतक्यांत बाबा सत्य-नारायणाचा प्रसाद घेऊन येत असलेले दिसले. "लवकर यायचं" असं आईनं घाबऱ्या घाबऱ्या ओरडून बाबांना खुणावलं, माझ्या हातात प्रसाद टाकून बाबा तडक आंतच गेले. प्रसाद तोंडांत कोंबून मी ही आंत जाऊन पहातों तों आजी देवाकडे गेल्याचे मला समजलं !

आशा अनपेक्षित प्रकारें माझ्या लग्नाचा आधार नाहींसा होऊन बाबांच्या मर्जीवर माझं लग्न विसंबून राहिलं.

बाबांकडे पाहून मला मुली सागून येत—पण—"तूर्त कर्तव्य नाहीं" हा बाबाचा जबाब जगजाहिर झाल्यापासून मुलींच्या बापानीं माझं नांव वर-संशोधन यादींतून काढून टाकलं असावं ! माझ्या बरोबरीच्या मुली लेकुरवाळया झाल्या तरी मी आपला नवरा मुलगाच !

लग्न म्हणजे काय हे समजण्या इतका मी सज्ञान झालों नव्हतों असं नाहीं. पण बाबांना तेंवढं ज्ञान पुरेसं न वाटून माझ्यावर त्यांनीं शिक्षणाचा जुलूम चालवला होता. परीक्षेंत मी

पुन्हां पुन्हां "वन्स मोर" घेऊन दाखवीत होतों; तरी बाबा आपला हट्ट सोडिनात! अखेर पाच मास्तर मला शिकवाला ठेवले. तेव्हा आजीची आठवण येऊन रडूं कोसळे. आणि वाटे आजी असती तर कोणाची माय नसती व्याली मला शीक म्हणण्याची! उलट एव्हांना पणतू होणार या आनंदात आजी माझी दृष्ट देखील काढती! पण बाबांना आतां कोणाचा धाकच राहिलेला नव्हता!

आई देखील कंटाळून गेली माझ्या शिक्षणाला. अखेर तिनंच लग्नाची उचल केली. माझ्या मावशीच्या मार्फत चांगली आठरा वर्षांची मुलगी सांगून आली होती; आईच्या मनांत फार होतं या ठिकाणाला होकार देऊन लग्न उरकून घ्यायचं; बाबांनाहि मुलगी पसंत पडून तेहि लग्नाला संमती देण्यास तयार झाले होते. पण एक निराळंच अरिष्ट कोसळलं! आईला दोन दिवस ताप येऊन चार दिवसांतच ती आजीकडे गेली! माझी स्थिति काय झाली असेल ती एक आईच जाणे!

या वेळीं बाबांचं वय चाळीशीच्या आत बाहेर असेल; घरांत करायलाच कोणी नाहीं एवढ्यासाठीं तरि आतां बाबा माझ्या लग्नाला उशीर लावणार नाहींत या आशेनं आई गेल्याचं दुःखहि मी गिळून टाकलं—पण बाबांचे दिवस कसे जावे ही काळजी त्यांच्या खास दोस्तदाराना पडून, बाबानींच लग्न करावें असा सर्वांचा सल्ला पडला.

या गोष्टीला बाबांनीं किती आढेवेढे घेतले असतील ते असोत; पण आई वारल्यानंतर महिन्याच्या आंतच बाबांनीं

मला दुसरी आई आणून दिली तीही दुसरी तिसरी कोणी नसून माझ्यासाठीं आईनें पाहून ठेवलेली व बाबांना पसंत असलेली मुलगीच होय ! याहून माझ्या लग्नाचा चमत्कार तो काय असायचा ?

दोन वर्षांच्या आंतच बाबांच्या इस्टेटीला वारस उत्पन्न होऊन, मला देशांतर करणंच भाग झालं ! साधूच्या वेषांतरा-खेरीज उदर्निर्वाहाचंही साधन नसल्यामुळें बालब्रह्मचारी बोआ या नावानें माझी हळूहळू प्रसिद्धी होऊं लागली; माझ्या आशिर्वादानें दुर्धर रोग नामशेष झाले; संततीची आशा सोडलेल्याना माझ्या अंगाऱ्याचा जादूसारखा उपयोग झाला. कित्येकाचे विवाह मी दिलेल्या पाणीग्रहणानें होऊं लागले. हा काय चमत्कार आहे हें माझं मलाच समजेना ! कांहीं दिवस मीहि अंगाऱ्याची राख लावून पाहिली; परंतु स्वप्नांतहि लग्नाचा साक्षात्कार झाला असेल तर शपथ !

माझा लौकिक ऐकून दूर दूरच्या बाया बापड्याहि येत. मी पैशाला शिवत नाहीं अशी माझी चोहोंकडे ख्याती होती तरी माझा द्रव्यनिधि दिवसेंदिवस वाढतच चालला होता. बायकांचा घोळका माझ्या भोंवती बसला कीं माझ्या दुर्दैवाबद्दल मला परमावधीचें दुःख होई ! त्यांत संसाराला पुरून उरेल इतका द्रव्यसंचय झालेला असल्यामुळें लग्नाचे विचार अनावरपणें मनांत येत. अशा स्थितींत माझे हातून

भलताच प्रमाद घडला. कायदेशीर चतुर्भुज होण्याचा दुर्धर प्रसंग येणार असें पाहून मी एक दिवस नापत्ता झालों तो अद्यापहि माझा पत्ता कोणालाही नाहीं. येत्या फाल्गुन पौर्णिमेला मला साठावें वर्ष बसेल. ज्योतिषदृष्ट्या हें वर्ष स्त्रीसौख्याच्या दृष्टीनें सर्वोत्कृष्ट असतें. बघावें काय होतें तें.



## नवजीवन मासिकाच्या

## " फडके विशेष-अंकावरील " कांहीं

# अभिप्राय.



" केसरी "

" रा. फडके यांची ख्याति केवळ श्रेष्ठ दर्जाच्या शिल्पकलेवरच विसंबून ठेवणाऱ्या त्यांच्या चहात्यांना या अंकांतील त्यांचे लेख वाचून रा. फडके यांच्या कलेचे नानाविध पैलू लक्षांत घेऊन त्यांजबद्दल आदर वाटूं लागेल यांत शंका नाहीं. त्यांच्या विनोदी लेखांत जसा कल्पनेचा विलास दिसून येतो तसाच त्यांच्या लघुकथांत त्यांच्या मार्मिक निरीक्षण-शक्तीचा प्रत्यय येतो. विशेषत: " छोटी पण मोठी " आणि " बहुमोल स्त्रीधन " या गोष्टी हल्लीं सरसहा प्रचलित असलेल्या रसांना स्पर्शही न करतां चटकदार उतरविण्यांत त्यांनीं मोठें कौशल्य दर्शविलें आहे, यांत संशय नाहीं.—रा. फडके यांच्या या सव्यसाचित्वाबद्दल कोणालाही अभिमानच वाटेल. "

**“ नवाकाळ ”**

“ श्री. फडके हे चौरसबुद्धीचे कलावन्त आहेत. शिल्पकलेंत त्यांनीं प्राविण्य संपादन केलें आहे, ते उत्तम चित्रकार आहेत. त्यांनीं काव्यनिर्मितीही केली आहे आणि टीकाकार व विनोदी लेखक म्हणून त्यांचें नांव महाराष्ट्रापुढें प्रमुखपणें आहे. ”

**“ ज्ञानप्रकाश ”**

“ यांतील कोणतेंही प्रकरण त्या त्या शाखेंत प्रामुख्य पावलेल्या व्यक्तींच्या नांवाखालीं छापलें असतें तरी चालण्यासारखें होतें. इतकें तें ठसठशीत आणि मनोवेधक उतरलें आहे. विशेषतः “ विठ्ठलपंतांची मुलाखत ” हें प्रकरण यांची सूक्ष्म निरीक्षण शक्ति उत्कृष्ट रीतीनें निदर्शित करणारें आहे. विनोदीवाङ्मयांत प्रसिद्धी मिळविलेल्या कोणाही प्रमुख लेखकाच्या सरस कृतीशीं बरोबरी करणारीं हीं प्रकरणें आहेत. ”

